


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








वर्ष २३ वे
एप्रिल ६७
मूल्य १। रु.



# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कला विलास



## श्रेयनामावलि–




दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकास रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओ या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay -4





## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# हे अटळ आहे....

**आंब्याला** मोहर आला आहे. मघुनमघुन रसवंती आंबे आकार घेऊ लागले आहेत. सृष्टीचे भाट वसंताच्या आगमनाची गाणी गाऊ लागले आहेत. धरती नवे रूप लेवू लागली आहे. झाडे नवी वस्त्रे परिधान करू लागली आहेत. फुलांचा सुगंध सर्वत्र दरवळू लागला आहे. सृष्टीची रंगपंचमी साजरी होऊ लागली आहे. त्याचे ढोल डिंडिम पिटले जाऊ लागले आहेत. गणगोत जमते आहे. आमंत्रणे गेली आहेत. मेणे पालख्या निघाल्या आहेत. आकाशयाने फिरू लागली आहेत. ढगांच्या हत्तींवर बसून सृष्टीचे दूत धरतीवर वस्तीला येऊ लागले आहेत. अशिवाचा संहार-अमंगलाची होळी साजरी करण्यासाठी सारेजण जमले आहेत, होळी साजरी करण्यासाठी ! युगामागन युगे गेली, शतकामागून शतके गेली, अनेक रथी महारथ्यांनी ह्या अशिवाच्या, अमंगलाच्या ह्या दहन–यात्रेत भाग घेतला. पण अशिव सरले नाही. अमंगल टळले नाही. आत, बाहेर हे सुर–असुरांचे द्वंद चालूच राहिले. अशिवाचा शिवावर विजय मिळविण्याचा खटाटोप चालूच राहिला आहे. हे द्वंद्व संपावे आणि शिवाचा विजय व्हावा म्हणन साऱ्या सुरशक्ति युगामागून युगे प्रयत्नशील आहेत. पण प्रकाश आहे तिथे छाया असलीच पाहिजे ह्या नियमानुसार जणु अशिवाने शिवाची पाठ सोडलीच नाही. शिव वाटचाल करीतच राहिले आहे. पण अशिवाच्या पाठ राखणीची एक बोचणी मनात ठेवून, त्याचा मागोवा घेत घेत ते चालत आहे. प्रतिवर्षी त्या अशिवाला समारंभपूर्वक जाळून टाकण्याचा सोहळा होतो. त्या सोहळ्याचे नाव होळी! अशिवाची होळी, अमंगलाची होळी, खुजे, मर्यादित, संकुचित असेल त्या साऱ्यांची होळी आणि शिवाची पूजा, मंगलाचा महोत्सव म्हणजे होळी! 'अशिव जाऊ द्या मरणालागुनि। जाळुनि किंवा पुरुनी टाका' असेच जणु तो सृष्टीचा निर्माता पक्षीमुखाने सांगून जातो. होळी उभी राहते. सारे अमंगल जळून जाते. पांच दिवस जळतच राहते. सृष्टीवर आनंद पसरतो. साऱ्यांना नवे रंग रूप लाभते. सौंदर्याचा नाच सृष्टीच्या अंगांगावर सुरू होतो. मग हे सारे रंग एकत्र येतात. गाऊ लागतात मंगलाचे गीत ! त्यातून स्रवतात रंग–फक्त रंगच ! साजरी होते रंगपंचमी! मंगलाचा महोत्सव. अमंगल दहनाचा आनंदोत्सव. नव्या वसंताची नांदी गात गात तो सुरू होतो आणि साऱ्या रंगाची उधळण सृष्टीवर करीत तो संपतो. सरली होळी. अमंगलाला–अशिवाला स्वर्गद्वारी पोहचवून ती संपली. ज्वाला शांत झाल्या. धग संपली. रंगांनी गारवा आला. रंगाची उधळण लेवून उभी राहिलेली सृष्टि पाहून मने तृप्त झाली, मनातले मोर नाचू लागले. गाऊ लागले—नकळतच वसंताचे गीत! 'फुल गळे, फळ गोड जाहले' ह्याचा प्रत्यय येऊ लागला. "बीज नुरे डौलात तरु डुले" हे जाणवू लागले. दहनाचा आनंद, आणि नवनिर्माणाची नांदी! अशिवाचा विनाश आणि शिवाचा विजय. होळी आणि रंगपंचमी! पण हे चक्र अटळ आहे. प्रवास अटळ आहे. होळी आणि रंगपंचमी अटळ आहे. कारण ह्या द्वंद्वात्मक जगात अशिव अटळ आहे. अमंगल अटळ आहे. म्हणून त्यांच्या संहारासाठी होळीची प्रेरणा ही अटळ आणि रंगपंचमीचा आनंदोत्सवही अटळ आहे. वसंताची वाट मोकळी करून देण्यासाठी, सृष्टीचे नवगान गाण्यासाठी, शिवाच्या वसंतोत्सवासाठी, सुरांच्या जयजयकारासाठी, वृन्दावनातल्या गोपींसाठी, कृष्णाच्या राधिकेसाठी वृंदावनातला वसंतोत्सव साजरा करण्यासाठी हा होलिकोत्सव साजरा केलाच पाहिजे. तो अटळ आहे.

—संपादक







Office of the Flag Officer
Commanding, Indian Fleet,
Fleet Office, Naval Dockyard,
Bombay-1.
20th Feb. 1967
No. FB/0123.

Shri. D. D. Dalal,

Thank you for the complimentary copy of Dipavali, February 1967 issue.

2. The articles published about the Indian Navy are interesting and highly informative

3. I am sure these will be appreciated by all readers of your esteemed publication.

Yours faithfully,
**J. S. Mehera**
for REAR ADMIRAL

**SAINIK SAMACHAR**
The Pictorial Weekly of the Armed Forces.
Ministry of Defence
A.F.O. Mess
Rajendra Prasad Road,
New Delhi-11.
1561/2, AMR (85)/V/-20-2

स. न. वि. वि.

आपले दि. ३० जानेवारीचे पत्र पावले. आपण पाठविलेला 'दीपावलीचा' अंक मिळाला.

भारतीय नौदल-दर्शन विशेषांक अतिशय उत्कृष्ट आणि आपल्या लौकिकास साजेसाच काढल्याबद्दल अभिनंदन.

क. लो. हे. वि.

आपली,
**शकुंतला दाते**
तर्फे मराठी विभाग प्रमुख

## नौदलाची चांगली ओळख

पेटी ऑफिसर्स मेस,
आय. एन. एस. 'वल्सुरा'
जामनगर.

स. न. वि. वि.

महोदय आपला भारतीय नौदल विशेषांक वाचला. आपण केलेल्या या प्रयत्नाबद्दल मी, व माझ्या सर्व महाराष्ट्रीय मित्रांचे वतीने, आपले मनःपूर्वक अभिनंदन करतो.

ज्यावेळी मी रजेवर जातो, त्यावेळी पुष्कळसे सुशिक्षित लोकसुद्धा 'तुम्ही नेव्हीमध्ये काय करता?' असा प्रश्न विचारतात. परंतु आपण प्रसिद्ध केलेल्या या "नौदल-दर्शन" अंकामुळे एखाद्या खेडुताला देखील 'नेव्ही' म्हणजे काय हे समजू शकेल. विशेषतः या अंकातील, 'अश्रूंचे आखात' हा रि. अॅड. करमरकर यानी लिहिलेला लेख खरोखरच प्रत्यक्ष प्रसंगच डोळ्यांसमोर उभा करतो. 'लायन ऑफ दि रेड सी' ही त्याना दिलेली पदवी अगदी योग्य आहे.

आपण केलेल्या या प्रयत्नांचे सर्वत्र कौतुक होत आहे. त्याचप्रमाणे आम्हा नाविकांचा होसला, अभिमान व विश्वास दृढ होत आहे.

(ई. एपी.-४) **सी. एस. गायकवाड**

## 'ते' ध्वज परकीय का?

स. न. वि. वि.

'दीपावली'चा फेब्रुवारीचा अंक वाचला, बघितला. अंक सुंदर व मार्मिक आहे. ह्यांत शंकाच नाही. अपार कष्टाबद्दल धन्यवाद!

मात्र कव्हरमध्ये एक चूक आढळली, ती लिहीत आहे. त्या चित्रात बोटीवरील फ्लॅग सर्व विदेशी आहेत. ते पाहून धक्काच बसला. बाकी सर्व निर्दोष आहे. पत्राबद्दल क्षमस्व.

पुन्हा एकदा धन्यवाद.

आपला,
**पद्माकर रणजीत**

वरील प्रमाणे अन्यही काही वाचकांनी विचारणा केली आहे. त्याचे निरसन असे:—

(१) ते चित्र 'दिल्ली' या भारतीय नौदलाच्या पहिल्या ध्वजनौकेचे आहे. तिची माहिती, 'असे आहे आमचे आरमार' या मुलाखतीत आहे.

(२) त्या चित्रात एका ध्वज-दंडाला जो एकच ध्वज दिसतो, (त्या बाजूला इतर कोणतेही ध्वज नाहीत) त्यात लाल चौकोनात वरच्या कोपऱ्यात राष्ट्रध्वज




आहे. तो नेहेमी तेथेच लावला जातो. इतर राष्ट्रांच्या आगबोटींवरील राष्ट्रध्वजही त्याच ठिकाणी असतात.

(३) व्यापारी तसेच नौदलातील बोटींवरील ध्वज-स्थानांची एक आंतरराष्ट्रीय पद्धत आहे. त्यानुसार सर्व राष्ट्रांच्या सर्व प्रकारच्या बोटींवर ध्वज लावले जातात.

(४) त्या चित्रातील एकही ध्वज परकीय नाही. पांढरे कापड व त्यावरील तांबडे पट्टे म्हणजे युनियन-जॅक नव्हे. तसेच अन्य एकाखाली एक असलेले रंगी-बेरंगी ध्वजही परकीय नव्हेत. त्याबाबत तांत्रिक-तपशीलवार माहिती श्री. जनता-संपर्क-अधिकारी, दक्षिण-सेना-विभाग, महाराष्ट्र-गुजरात एरिया, कुलाबा, मुंबई ५ यांजकडून मिळू शकेल.

(५) 'दिल्ली'च्या सर्वात उंच डोलकाठीवरील ध्वज नौदल-प्रमुखांचा आहे. रिअर अॅडमिरल, व्हाइस-अॅडमिरल व अॅडमिरल व अॅडमिरल ऑफ दी फ्लीट यानाच आपापला ध्वज असतो. त्यांचेसाठी अनुक्रमे एक, दोन, तीन व चार लाल ठिपके त्या ध्वजात असतात. आपले नौदल-प्रमुख हुद्याने व्हाइस-अॅडमिरल आहेत. त्यांचाच ध्वज 'दिल्ली'वर डौलत आहे. मात्र ते अधिकारी प्रत्यक्ष त्या 'फ्लॅगशिप'वर असतात तेव्हाच त्यांचा ध्वज लावला जातो. एरवी नौदल पद्धतीनुसार इतर ध्वज तेथे लावले जातात.

**—संपादक**



अनुक्रमणिका



—मा. कृ. पारधी

**त्या सगळ्या सोहळ्यात रमाबाईंना फुलून आल्यासारखं वाटलं होतं. ही देवाची भुकेली माणसं आपल्यावर एवढी श्रद्धा ठेवतात, पण आपण त्या श्रद्धेला खरोखरंच पात्र आहोत का?**



**पाठ** संपला आणि रमाबाईंना हलकं हलकं वाटलं. त्यानी पोथीला भक्तिभावानं नमस्कार केला. मनात म्हटलं, "महाराज, तुमचा आदेश पाळला. माझ्याकडन घ्यायची असेल ती सेवा मी ज़िवंत असेपर्यंत घेऊन टाका."

मग त्यानी निरांजन तबकात ठेवलं. तबकात ठेवलेला कापराचा खडा निरांजनाच्या ज्योतीनं पेटवला आणि त्या आरती गुणगुण लागल्या. त्यांच्या अर्धवट मिटलेल्या डोळ्यांपुढे कापराची धगधगती ज्योत मोठी होऊ लागली. केवढा जाळ पेटतो आहे ! त्या जाळाचा प्रकाश आपलं अंतराळ उजळीत आहे आणि अंतरंगाचा गाभारा उजळत उजळत विशाल अन् मोकळा होत आहे असं त्याना वाटू लागलं. गाता गाता त्यांचे डोळे मिटले. त्या अंतराच्या गाभाऱ्यात आरतीचा नाद घुमू लागला. नाद आणि प्रकाश यातला फरकच त्याना कळेनासा झाला. जणु ती कापराची ज्योत नादमयच होती.

रमाबाईंच्या समोर चार पांच भाविक बाया बसल्या होत्या. त्या हातानी ताल देत, रमाबाईंच्या सुरात सूर मिसळून आरती गात होत्या. त्या प्रभामय आरतीत ती खोली आपलं वेगळेपण विसरून गेली.

आरती संपल्यावर तबक पोथीपुढं ठेवून रमाबाईंनी पुन्हा नमस्कार केला. एक एक बाई येऊन कापराच्या ज्योतीवरून हात फिरवून आरती घेऊ लागली. रमाबाईंनी प्रत्येकीला तीर्थ दिलं, प्रसाद दिला. मग तशाच पूजेच्या चौरंगापुढं बसून राहून त्या बायकांशी इकडच्या तिकडच्या गप्पा मारू लागल्या.

"बाई ! रहा ना आणखी चार-आठ दीस. तुम्ही असल्या की जिवाला बरं वाटतं. दिसाकाठी देवाचं नांव तरी तोंडून निघतं." एक कुळवाडी बाई म्हणाली.

"खरंच रहा बाई ! आठा दिसानं कार्तिकी एकादशी आहे. मग आम्ही तुमच्या संगं पंढरपुरी येऊ." दुसऱ्या एका पोक्त बाईनं दुजोरा दिला.

"बा ग बा ! तुमचं काय जातं रहा म्हणायला ? मला काही

अनुक्रमणिका

घरदार आहे की नाही ?" रमाबाईंनी त्यांचा आग्रह हसण्या-वारी नेला.

आपण हे उगीचच काही तरी बोलतो आहोत हे रमाबाईंना कळत होतं. त्यांना घरदार होतं खरं. पण त्यातून त्यांचं मन उडालं होतं. थोरपणाची पिढीजात रीतभात सांभाळणं एवढ्यापुरतंच आता त्यांचं त्या घराशी नातं होतं. आणि कार्तिकी पौर्णिमेला त्यांच्या वाड्यातल्या देवळात त्रिपुर जाळण्याचा जो मोठा उत्सव होत असे, त्याची व्यवस्था करण्यासाठी त्यांना आता लौकर गावी जायला हवं होतं.

या गावात त्यांनी मांडलेला उपक्रम तीन दिवसांपूर्वी यथासांग पार पडला होता. महिना सव्वा महिना त्यांनी हे गाव गदगदून टाकलं होतं. गावातल्या बायकांबरोबर पुरुषानाही जणु भक्तीचा नवा चेव आला होता. रमाबाईंनी गावात बायकांचं भजनमंडळ सुरू केलं हे पाहून पुरुषानीहि भजनमंडळ काढली होती. रोज रात्री भजनाला चार-पांचशे बायका आणि हजारभर पुरुष जमत. भजन संपल्यावर रमाबाई तासभर प्रवचन करीत. हरिपाठावर त्यांनी आठवडाभर प्रवचनं दिली. एकनाथी भागवताचं पारायण पुरं केलं. रोज सकाळी रमाबाई योगासनाचे वर्ग घेत. या वर्गात लहान मोठ्या शंभर-सवाशे बायका महिनाभर येत होत्या. या सर्व उपक्रमाचं उद्यापन गावानं मोठ्या उत्साहानं साजरं केलं. गावातील विठोबाच्या देवळात महापूजा झाली. स्त्री-पुरुषांच्या मिळून आठ-दहा दिंड्या गावातून मिरवत देवळात गेल्या. मिरवणुकीत हजारो लोक सामील झाले. गावातील दोनचार प्रतिष्ठित महाजनांनी अहम-हमिकेनं महापूजेचा खर्च केला. दोन चार हजार पानं उठली. रमा-बाई स्वत:साठी काहीच बिदागी घेत नसत. म्हणून गावानं त्यांना विठ्ठलाची चांदीची मूर्ति भेट देऊन त्यांच्याविषयीचं प्रेम व्यक्त केलं.

त्या सगळ्या सोहळ्यात रमाबाईंना फुलून आल्यासारखं वाटलं होतं. ही देवाची भुकेली माणसं आपल्यावर एवढी श्रद्धा ठेवतात, पण आपण ह्या श्रद्धेला खरोखरी पात्र आहोत का ? असा विचार अनेकदा त्यांच्या मनात येतो आणि त्या अस्वस्थ होतात. ही भाबडी माणसं आपल्याला संतीण समजतात. पण कशासाठी आपण स्वत:ला यांच्यापेक्षा मोठं समजायचं ? देवाची पूजा केली, भजन म्हटलं अन् प्रवचन दिलं एवढ्यानंच आपल्याला संताची पदवी प्राप्त होते का ? ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांच्या पाया-खालची धूळ होण्याची तरी आपली लायकी आहे का ? वासनांच्या कर्दमात आपणहि लोळलो. अहंकाराचा हत्ती आपल्याहि जीव-नात झुलला. बरं झालं ते सारं आता लांब गेलं. आता ह्या भाबड्या जीवांचा भोळा भाव आपल्याला जिव्हाळ्याचा वाटतो. त्यानंच आपल्या मनाला नम्रपणा येतो, निर्मळपणा येतो. देवाच्या काजात मन रमलं की बाकी सारं कसं असार वाटतं ! आपण क्षुल्लक आहोत. ह्या लोकांच्या श्रद्धेनंच आपल्याला बळ येतं. ह्या आपापल्या संसाराचं ओझं वहात असलेल्या बायका आपल्यावर एवढा जीव टाकतात. आपण सांगू ते करतात. आपल्या घरातला घास आपल्याला देऊ पहातात. आपण जाणार म्हणून हळहळतात. हा सारा त्या देवाचा महिमा. त्यांच्याच हृदयात देव वसतो, पण तो त्यांना दिसत नाही, म्हणून आपल्या ठिकाणी त्या देवपण पहातात. आपल्या ठिकाणी त्यांना दिसणारं देवपण हे त्यांच्याच हृदयातल्या देवाचं प्रतिबिंब. त्यांचं देवपणच आपल्यातलं देवपण घडवत आहे. म्हणून आपलं देवपण त्यांनाच समर्पण.

रमाबाई बायकांशी बोलता बोलताच स्वत:शी असं हितगूज करीत होत्या. त्या बायकांची ही लडिवाळ ममता तोडून जाणं खरंच त्यांना बरं वाटत नव्हतं. रक्तामासाच्या ममतेचे पाश तुटले खरे; पण हे वेगळ्याच ममतेचे पाश आपल्याला बांधून टाकीत आहेत या जाणीवेची त्यांना मनातल्या मनात गंमत वाटली.

रमाबाई आपल्या पूर्वायुष्याकडे आता तटस्थपणे पाहू शकत होत्या. त्यांच्या तुलनेत त्यांचं आजचं आयुष्य त्यांना अधिक सुखी, अधिक अर्थपूर्ण वाटत होतं. पण तरीहि आपल्या आयुष्याचा अर्थ आपल्याला कळला आहे असं त्यांना वाटत नव्हतं. आपल्या कालच्या आणि आजच्या आयुष्यात त्यांना काही संगति दिसत नव्हती; पण काहीच संगति नाही हे मानायला त्यांचं मन तयार नव्हतं. बऱ्या वाईटाच्या कल्पनांवर घासून पहाता त्यांच्या पूर्वायुष्यात त्यांना काहीच बरं दिसत नव्हतं; तरीही ते सारंच वाईट कां म्हणायचं हे त्यांना कळत नव्हतं. त्यांनी आयुष्यात काय भोगलं नव्हतं ? काय सोसलं नव्हतं ? भिक्षुकाची मुलगी राजाची राणी झाली. या हातांनी पाण्यासारख्या पैसा उधळला. या शरीरानं सारे सुखविलास उपभोगले. पण तरीहि मन कोरडंच राहिलं, देह पोळत राहिला. साधुवैराग्यांच्या आशीर्वादाचं तेज कपाळावर चढलं, पण मन मारता आलं नाही. आणि पेटता पेटताच इंधनाची राख होत गेली. आज सारे पाश नष्ट झालेले दिसत असले तरी ते गळले म्हणून नव्हे; जे त्यांनी बांधलं होतं तेच राख होऊन गेलं म्हणून. त्या राखेतूनच जणु त्यांचा नवा जीव जन्माला आला. तो कसा, कधी, हे त्यांना कळलंच नाही. त्याला काही संगति नाही, काही कारणपरंपरा नाही. हे असं कां होत गेलं ? याचं उत्तर त्यांना ठाऊक नाही. हे केवळ पूर्वसंचित. तो भोगवटाहि पूर्वसंचिताचाच भाग. आजचं नवं आयुष्य हेहि पूर्व-संचिताचीच पुण्याई. ह्या गावाशी त्यांचा ऋणानुबंध पूर्वजन्मीचाच असावा. ह्या जन्मात त्यांचा भाऊ या गावात रहातो. ओढगस्तीचा संसार असलेल्या भावाच्या घरात रमाबाईंना आपल्या संपत्तीची जाणीव विसरता येते. त्यांच्या घरी त्यांच्यामागं किती विंचवडे लागतात ! त्या संपत्तीच्या जंजाळात नको म्हटलं तरी त्यांचं मन व्यग्र होतं; मग त्रासहि होतं. इथं या दोन खोल्यांच्या संसारात त्यांचं स्वत:चं काही नाही. मनावर भार नाही. म्हणून अधिक तन्मय-तेनं त्या येथे भजन-पूजन करू शकतात. पण घरी त्रिपुरी पौर्णिमेच्या उत्सवाची तयारी करायची आहे. ती सारी त्यांनाच केली पाहिजे. मुलगा नालायक आहे. हाती आलेल्या संपत्तीच्या तोऱ्यात देवधर्म जाणत नाही. आईची ओळख विसरला आहे. घरातील एक आश्रित बाई याखेरीज त्याला आईची किंमत वाटत नाही. ज्या घरात गडगंज संपत्तीची स्वामिनी म्हणून त्यांनी अधिकार गाजवला त्याच घरात त्या आज परक्या झाल्या आहेत. या साऱ्या संपत्तीला










# "नव्या मनू"ची शिल्पकार ही

गेल्या वर्षीच्या प्रारंभाला "भारतरत्न" (किताबात बसणारे ते व्यक्तिमत्व नव्हते हे मान्य करूनही) लालबहादुर शास्त्री ताश्कंद येथे अचानकपणे दिवंगत झाले. "पंडितजींनंतर कोण" ह्या प्रश्नाची चर्चा पुष्कळ दिवस चालली. पण "लालबहादुर शास्त्रींनंतर कोण ?" असा प्रश्न एकाही मनात वा एकाच्याही स्वप्नात नसताना अचानकपणे उभा राहिला आणि चर्चा करायला फारसा वाव न देता त्याचे उत्तर शोधावे लागले. ते उत्तर एका स्त्रीत होते. आणि ती स्त्री पंडितजींच्याच घरातली निघाली. त्यांची कन्याच! गतवर्षी जगातल्या एका मोठ्या लोकशाहीचे नेतृत्व करण्याची संधि भारताने त्या स्त्रीला दिली. मनूच्या देशातील एक स्त्री एक 'नवा मनू' घडवायला उभी राहिली. स्वातंत्र्योत्तर कालातली ही एक आगळी, पण महत्त्वपूर्ण घटना होती. इंदिराजींची पहिली राजवट अकरा महिने टिकली. पंडितजींचा फार मोठा वारसा त्यांना सांभाळायचा होता. पक्षात पडझड झाली होती. देशात अहिंसक-हिंसक आंदोलने चालू होती. उपोषणांना उधाण आले होते. ह्या साऱ्या कसोटीच्या क्षणात इंदिरा गांधी ह्यांनी आपली धीरवृत्ती सोडली नाही. खंडप्राय देशाचे, विभिन्न मनोधारणा धारण करणारांचे एक राज्य राखणे ही खरं तर तारेवरची कसरतच! जरा तोल गेला की, कपाळ मोक्षच! इंदिराजींच्या अकरा महिन्याच्या राजवटीत त्यांनी नवा विश्वास दिला आणि भुवनेश्वर येथे प्रत्यक्ष 'मार' खाऊनही आपली मान व शान कायम राखली. 'चणे खावे लोखंडाचे' हा ब्रह्मपद मिळविण्याचा राजमार्ग ! इंदिराजींनी 'दगड' पचविले आणि पंतप्रधानकीच्या लढतीत त्यांनी कणखरवृत्तीने वागून ह्या देशाचे 'ब्रह्मपद' मिळविले आहे. इंदिरा गांधी ह्यांना 'अनुभव' कमी असला तरी 'निर्णय' घेण्याची क्षमता आहे. पंजाब, गोवा ह्यासारख्या प्रश्नात ही गोष्ट दिसून आली. 'सीमा कमिशन' कार्यरत झाले. मंत्रिमंडळात 'नवे रक्त' आणण्याची त्यांची कृतीही त्यांच्या 'तरुण' वृत्तीची निदर्शक आहे. शास्त्रीजींनी निर्माण केलेली प्रतिभा त्यांनी डागळू दिलेली नाही. ह्या देशात 'समस्या' भरपूर आहेत. पण 'निर्णय' घेण्याच्या वृत्तीमुळे त्यांची संख्या घटेल. आज त्यांची अविरोध निवड झाली आहे. पण एका बिकट परिस्थितीत त्या उभ्या आहेत. सहा सात प्रांतांत विरोधी दलांची मंत्रिमंडळे आहेत. घटनात्मक ज्ञानाची आणि संयमी नेतृत्वाची कसोटी देण्याचा हा प्रसंग आहे. "खंबीर नेतृत्वाची गरज मी भागवीन" असेच जणु त्यांनी बजावले आहे.

इंदिराजींचे आम्ही अभिनंदन करतो. आमच्या निष्ठा ह्या नेहमीच पंतप्रधानांच्या पाठीशी उभ्या राहतील !

—संपादक

आग लावून टाकावी असं कधी कधी त्यांच्या मनात येतं. पण आपल्या ह्या संतापाचं मग त्यांनाच नवल वाटतं. काय करायचं आहे आपल्या ह्या संपत्तीचं ? अजून आपण मायामोहातच गुंतलो आहोत ना ? किती विचित्र असतं माणसाचं मन ! बरं—वाईट दोन्ही त्यात एकत्रच नांदत असतं. आसक्ति अन् निरासक्ति दोन्ही त्याला दोन बाजूनी खेचत असतात. कालचं अन् आजचं वेगळं वेगळं निवडणं कठीण जातं. ही सरमिसळ बरोबर घेऊनच चालत रहायचं. एकाच वेळी घरात बांधलेलं आणि घराबाहेर मोकळं असं वावरायचं. अर्धं मन इकडे, अर्धं मन तिकडे. चला. आज इथलं कार्य पुरं झालं. आता पुन्हा कर्तव्याचा भार वहायला घरी जायचं.

खरं म्हणजे दोन तीन दिवसांपूर्वीच त्यांचा जाण्याचा बेत होता. पण अचानक हा गुरुचरित्राचा पाठ मध्ये आला. जाण्याच्या दिवशी पहाटे त्याना एक स्वप्न पडलं. गजानन महाराज त्यांच्या स्वप्नात आले आणि म्हणाले, "इथे सव्वा महिना तू चांगलं काम केलंस. आता गुरुचरित्र कां नाही वाचीत ?" तेवढ्यात रमाबाईना जाग आली. पूर्वदिशा उजळू लागली होती. त्यांची आन्हिकाची वेळ झाली होती. लगेच उठून त्या कामाला लागल्या. पण ते स्वप्नातलं दृश्य त्यांच्या मनातून जाईना. त्या आंघोळ करून ध्यानाला बसल्या. पण ध्यानात पुन्हा त्याना गजानन महाराजच दिसू लागले.

थोड्या वेळानं त्यांची भावजय पूजेचं साहित्य मांडून देण्यासाठी आली तेव्हा रमाबाईनी तिला विचारलं, "वहिनी, इथं गुरुचरित्र कुठे मिळेल का ग ?"

"कुठं कशाला ? आपल्याच घरी आहे गुरुचरित्राची पोथी ."

"आण पाहू. वाचून पहाते."

भावजयीनं आणून दिलेल्या पोथीचं तीन दिवस त्यानी पारायण केलं. पारायणाच्या वेळी दोन चार बायकाहि येऊन बसू लागल्या. पोथी वाचण्याचा मनावर काहीहि भार नव्हता. त्या स्वप्नाला त्या फारशी किंमत देत नव्हत्या. उगीच मनाला रुखरुख नको एवढ्याचसाठी त्यानी पोथी वाचायला घेतली होती. पण आज वाचन संपल्यावर त्याना जे हलकं वाटू लागलं ते मात्र अपूर्व होतं. आपलं मन आज अधिक उल्हसित आहे असं त्यांना जाणवत होतं. बायकाना त्या सांगत होत्या—

"पोथी वाचल्यावर किती बरं वाटतंय आज."

"असंच होतं बाई. देवाचं नांव घेतलं की मनाला समाधानी येते." त्या पोक्त बाई म्हणाल्या.

"तुमच्या मुखातून देवच बोलतो, बाई. म्हणून तुम्ही वाचता सांगता तेव्हा आमचंहि ध्यान लागतं." तिसरी म्हणाली.

तेवढ्यात दारातून हाक आली, "माई ! दार उघड."

दार सताड उघडं असताना कोण दार उघड म्हणत होतं ? रमाबाईनी दाराकडे पाहिलं. भगवी छाटी घातलेला कोणी बैरागी दारात उभा होता. रमाबाई लगबगीनं दारात गेल्या. साधुबैराग्यांचं आतिथ्य करणं हा घरचा रिवाज त्या आयुष्यभर पाळत आल्या होत्या. दाराशी जाऊन त्या म्हणाल्या, "आत या महाराज."



अनुक्रमणिका

त्यांच्या मागोमाग एक जटाधारी वृद्ध बैरागी आला. त्याचं वय सांगणं कठीण होतं. पाउणशेच्या पुढं नक्की गेलं असावं. पण अंगकाठी ताठ आणि टवटवीत. डोक्यावरच्या पिंगट पांढ्या जटांच्या पारंब्या चेहऱ्यावर दोन्ही बाजूना लटकत होत्या. पिंगट पांढरी दाढी. तांबूस सांवळ्या अंगकांतीवर भस्म फासलेलं. कपाळावर भस्माचंच जाड त्रिपुंड रेखलेलं. डोळे पिंगट, टपोरे आणि काहीसे उग्र. हातात कुबडी आणि नारळाचा कमंडलु.

रमाबाईंनी त्याना स्वतःच्या पाटावर बसवलं आणि आपण त्यांच्या बाजूला बसल्या.

"कुठून आलात महाराज आपण ?" रमाबाईंनी हिंदीत विचारले.

'आलो असाच, इकडून शेगांवहून आणि तिकडून शिरडीहून." वैराग्यानं हिंदीतच उत्तर दिलं. त्याचा आवाज पितळी भांड्यासारखा ठणठणीत होता.

वैराग्याचं उत्तर ऐकून रमाबाई स्वतःशीच हसल्या. साधू-वैराग्यांच्या लहरी स्वभावाची त्याना संवय होती. कोणी उगीच तापट वागेल, कोणी वेडसर बोलेल, कोणी आपलं वजन पाडण्यासाठी मोठ्या योग सामर्थ्याचा आव आणील. असंच काही विचित्र बोलण्याची या बैराग्याला लहर आली असावी. पण तरी आपलं बोलणं थट्टा वाटणार नाही इतक्या गांभीर्यानं त्या म्हणाल्या—

"पण महाराज ! एकाच वेळी दोन ठिकाणाहून कसे आलात ?"

"न यायला काय झालं ? माणसाला पांच प्राण आहेत ना ? मग पांच प्राण पांच ठिकाणाहून येऊ शकत नाहीत का ?"

हेहि उत्तर विचित्र होतं. म्हटलं तर पोचलेल्या सिद्धासारखं, म्हटलं तर वेदांताची पोपटपंची करणाऱ्या नकली साधूसारखं. अलौकिक अनुभवाचं किंवा लौकिक वेडगळपणाचं. यातलं काय समजायचं ? पण त्या बैराग्याच्या बोलण्यात काही अलौकिक भासविण्याचा आव नव्हता किंवा वेड्याचा भ्रांत भाव नव्हता. व्यावहारिक माणसानं साध्या प्रश्नाला सरळ उत्तर द्यावं इतकी सहजता त्यात होती. रमाबाईना ती सहजता जाणवली. पण तरीही त्या बैराग्याचा कस जोखण्यासाठी म्हणाल्या—

"पांच प्राण देहात नांदतात, महाराज. ते देहाला सोडून संचार करू लागले की देहाचं कलेवर होतं. आणि कलेवराला चलन नसतं."

"तुझ्या गुरूनं हेच ज्ञान दिलं का तुला ?"

बैराग्याचा आवाज करडा झाला. डोळ्यात धार आली. त्यानं रमाबाई दचकल्या. आता हा बैरागी संतापणार अशी त्याना भीति वाटली. बैरागी आत आल्यापासून एका महात्म्याचं दर्शन घेण्यास उत्कंठित झालेल्या बायका चपापल्या. आता काय होतं म्हणून बावरलेल्या उत्सुकतेनं त्या दोघांकडे पाहू लागल्या.

"घाबरलीस ? ये. माझ्या जवळ ये." आत्तापर्यंत स्वच्छ हिंदीत बोलत असलेला बैरागी शुद्ध मराठीत बोलू लागला. त्याचा आवाज एकदम सौम्य झाला.

"नाही, महाराज घाबरले नाही. पण आपलं बोलणं खरंच मला समजलं नाही."

# गड आला पण—



**कै. स. गो. बर्वे**

**नियति मोठी विचित्र असते पहा. ती केवळ क्रूर आहे असे म्हणावे तर तिच्या विनोदी व आनंदमय कृतींचे प्रसंगही डोळ्यापुढे नाचू लागतात. आणि तिच्या आनंदमय रूपात दंग व्हावे तो आघातामागून आघात घडताना दिसू लागतात. नियति लहरी आहे हेच खरे.**

सदाशिव गोविंद बर्वे यांच्या नांवामागे आमदार, खासदार, नामदार, नामदार अर्थमंत्री वगैरे क्रमाने बिरुदे लावावीत आणि त्यांचा यथोचित गौरव करावा असा संकल्प लक्षावधि मनात सुटत होता. ते निवडणुकीला उभे राहिले. त्यांच्या लढतीला बंड थोपटून श्री. व्ही. के. कृष्णमेनन उभे राहिले. "बर्वे की मेनन" अशी ती लढतच नव्हती. ती लढत होती दोन तत्त्वांची. दोन प्रवृत्तींची, दोन प्रकृतींचीही! त्यामुळे बर्वे यांचा प्रचार करणाऱ्या व बर्वे यांना मते देणाऱ्यांच्या मनःसमोर स्वप्ने होती "नामदार अर्थमंत्री बर्वे" यांच्या नियुक्तीची! नियतीचा संकल्प वेगळा होता. ती स्वप्ने अचानकपणे क्रूर आघात होऊन विरली. आणि अवघ्या काही तासांच्या आत 'नामदार अर्थमंत्री' बर्वे हे कैलासवासी स. गो. बर्वे झाले. विजयाचा आनंद ताजा होता. हार ताजे होते. कुंकुमतिलकातले कुंकूही भाळी कायम होते. बर्वे कर्तव्यकठोरतेने उभे राहिले. प्रचार केला, जिंकले आणि 'कार्यमग्न' बर्वे 'कार्यमग्न' असतानाच देवाघरचे बोलावणे येताच निघून गेले. मुखावर तृप्ति होती. चेहरा पेराक्रमाच्या तेजाने फुलला होता. अविश्रांत परिश्रम, अविचल ध्येयनिष्ठा आणि सतत उद्योगरत राहण्याची 'सैनिकी' वृत्ती ह्यामुळे बर्वे यांनी विजयश्री खेचून आणली. इतरत्र झालेल्या निवडणुका आणि बर्वे-मेनन निवडणूक यात फार तफावत होती. उद्याच्या एका फार महत्त्वाच्या प्रश्नाचे उत्तर बर्वे यांना विजयी होऊन द्यायचं होतं. ते त्यांनी 'तानाजी'च्या इरेसरीने दिले आणि आपला पराक्रम लोकशाही निष्ठा मानणाऱ्या भारतमातेच्या चरणी पेश






केला. तो पराक्रम, तो विजय, ती निष्ठा, ती कार्यतत्परता, ते मोहक व प्रेमळ व्यक्तित्त्व, ते प्रशासकीय कर्तृत्त्व हा बर्वे ह्यांनी मागे ठेवलेला वारसा आहे. मोठ्या कर्तृत्त्वाला मोठी आव्हाने लागतात. ती पेलण्याची ताकद आणि जिद्दही त्यात असते. बर्वे ह्यांनी स्वीकारलेले आव्हान मोठे होते. त्यांचा पराक्रम त्याहून मोठा होता हे काल पुरुषाने पाहिले. आपल्या इतिहासात तो पराक्रम त्याने नोंदून घेतला असलाच पाहिजे.

बर्वे हे निवडणुक जिंकले म्हणून केवळ शूर नव्हते. त्यांची सारी कारकीर्द ही शौर्यगाथाच आहे. गांधीजींच्या हत्येनंतरच्या काळात पुण्याला जाळपोळ, लुटालूट इत्यादी घटना घडू लागल्या. बर्वे ह्यांच्यासारखा 'शूर' पुरुष तेथे होता, म्हणून 'पुणे' फार मोठ्या आपत्तीतून वाचले. पानशेतच्या संकटानंतरही पुन्हा बर्वेच धावले. बर्वे यांची कुशाग्र बुद्धिमत्ता, कल्पकता, जिद्द, क्षेप, साक्षेपी वृत्ति, जन सुधारणेची तळमळ ह्या गुणांचा प्रत्यय 'नवे पुणे' व 'परिसर' देईल. पुणे ही बर्वे यांची कर्मभूमि होती; पण ईशान्य मुंबई मतदार क्षेत्र ही त्यांची 'रणभूमि' होती. ते त्यांचे 'कुरुक्षेत्र' होते. तेथे त्यांच्या मनातल्या 'योगेश्वराने' त्यांना सांगितले, मित्रा, "कर्मण्येवाऽधिकारस्ते । मा फलेषु कदाचन" "मामनुस्मर युध्यच" बर्वे यांनी कर्तव्य चोखपणे बजावले. समोर एकेकाळचे 'सोयरे' होते. पण 'युध्यच' हा संदेश त्यांनी सैनिकी निष्ठेने पाळला. विजयी झाले ते! आनंदोत्सव झाले. तत्त्वे विजयी झाली. पण बर्वे शालीन राहिले. कारण ऋजुता हा त्यांचा स्थायीभाव होता. "ज्यांनी मते दिली त्यांचा व ज्यांनी दिली नाहीत त्यांचाही मी प्रतिनिधी आहे" हे त्यांचे उद्गार त्यांच्या व्यापक मनोबुद्धीचा प्रत्यय घडवितात. पण हे मोठे मन निवडणुकीत पराभूत होणे शक्यच नव्हते. म्हणन की काय नियतीने अखेर ते उचलून नेले. बर्वे गेले. बर्वे 'नामदार अर्थमंत्री' व्हायच्या ऐवजी "कै. बर्वे" झाले. पण बर्वे यांची 'लढत' अमर झाली आहे. संगर गाजला आहे. त्यांच्या "गौरवाची गाथा" लोकशाहीनिष्ठ भारत गात राहणार आहे. 'आय्. सी. एस्.' बर्वे ह्यांच्यापेक्षा रणमर्द बर्वे, राष्ट्रसैनिक बर्वे, समाजसेवक बर्वे हे अवघ्या पांच सहा वर्षात घडलेले नवे रूप त्यांच्या मूळ सुंदर रुपड्यापेक्षा अधिक सुंदर ठरले आहे. बर्वे ह्यांची वृत्ति 'निराश, उदास' नव्हती. कटु अनुभव पचवूनही हा माणूस हसतच राहिला. ते हंसणे मृत्यूच्या दारातही कायम होते. ते जणु गात होते गीत "सुंदर मी होणार! सुंदर मी होणार!!"

'सुंदर झालेल्या बर्व्यांच्या 'प्रेरक' स्मृतींना अभिवादन.

**—संपादक**

"जाऊ दे. जे समजत नाही ते विचारू नये. बरं वाटलं तुला भेटल्यानं. तू अलिकडं चांगलं काम करते आहेस असं तुझ्या गुरूनी सांगितलं. इकडन जाता जाता तू इथे काही केल्याचं कळलं. म्हणून म्हटलं तुला भेटून घ्यावं."

"गुरूंचीच कृपा आहे ही, महाराज. त्यांच्याच बळावर थोडेसे हातपाय हलवते." असं म्हणत असतानाच रमाबाई मनात विचार करीत होत्या— आपले गुरु या बैराग्याला कधी भेटले ? आपल्य गुरूनी समाधी घेतल्याला आता वीस वर्षं झाली. आणि गुरु असेपर्यंत तर आपण त्यांचा मंत्र घेतला तरी साधना काहीच करीत नव्हतो.

"असंच चालू दे. झालं गेलं विसर. साधना करीत रहा."

"आपल्यासारख्यांच्या आशीर्वादानं जमेल तेवढं करीन महाराज."

"आम्ही आहोतच तुझ्या मागे. पण तू स्वतःला सांभाळलं पाहिजे. मनास येईल तसं वागू नकोस."

"मनालाच साक्षी ठेवते मी. दुसरं कोण आहे सांगणारं ?

"मनाचे खेळ भोगत आलीस ना जन्मभर ? मनाच्या हाती सूत्रं दिल्यानं आणखी काय होणार ! त्या मनाची कास सोड. तुला आदेश मिळंत जातील. तशी वागत जा. तुझी पुण्याई मोठी आहे."

वैराग्यानं मर्मावरच बोट ठेवलं. कोण आहे हा वैरागी ? तो आपल्या आंतरिक आयुष्यात असा अचूक कसा शिरला ? रमाबाईना बावरल्यासारखं झालं. आपल्याकडून काय हवं आहे याला ?

"आपली काय सेवा करू, महाराज ?"

"माझी काय सेवा करणार तू ? मी फकीर माणूस. आज इथे, उद्या तिथे. काय देशील तू मला ?"

"आपण मागाल ते ?"

"पैसे देशील. किती देशील ?"

"आपल्याला किती हवेत ?"

"काही नको. उगीच गर्व आहे तुला तुझ्या श्रीमंतीचा. त्या श्रीमंतीचा तुझा तुलाहि उपयोग नाही. दुसऱ्याला काय देणार मग?"

हा बैरागी आपल्याला 'भेटायला' आला आहे की आपली 'उणी काढायला ?'

"आपल्यासारख्या विरक्ताना काय देणार, मी महाराज ? आपण विचारलंत म्हणून बोलले."

"पण अभिमान आहे ना तुला ! अजून आहे. म्हणून म्हणतो, तुझ्या मनानं चालू नकोस. आदेश मिळेल तो पाळ."

रमाबाईना वाटलं या बैराग्याशी आणखी हुज्जत घालण्यात अर्थ नाही. हा सामान्य बैरागी नव्हे. त्याच्यापुढे आपलं अंतरंग उघडं आहे. आपली नम्रताच आपल्याला त्याच्या अंतरंगाचं दर्शन घडवील.

"आपला काय आदेश आहे महाराज मला ?"

"आदेश असा मागून मिळत नाही, बेटा ! तो आपोआपच येतो. वेळ आली की तो येतो. आणि तो मीच कशाला द्यायला हवा ? तुझा अंतरात्माच तुला आदेश देईल. ये. माझ्याजवळ ये. तुला तुझा अंतरात्मा दाखवतो."

रमाबाई जरा कचरल्या. संभ्रमात त्या आपल्या जागीच बसून राहिल्या.

"भितेस माझ्याजवळ यायला ? तू ओळखलं नाहीस मला ?"

"क्षमा करा महाराज. मी खरंच ओळखलं नाही."

"मी भेटलोय तुला आधी. पुढे ये अशी. तुला एक आठवण देतो. बद्रीनारायणाला मी तुला भेटलो होतो. तू गंगेजवळ उभी होतीस...

[ पृष्ठ ४८ वर पहा ]


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



# "अंमलदार जो विलक्षण अपवाद होता"

अनुवादक–श्री. बा. जोशी

[ हिंदीतील प्रथम श्रेणीचे नाटककार, आकाशवाणीचे माजी डायरेक्टर जनरल आणि आय्. सी. एस्. अधिकाऱ्यांतील एक जुने आणि जाणते अंमलदार, म्हणून जगदीशचंद्र माथुर यांचा लौकिक आहे. 'दस तस्वीरें' हा त्यांच्या सुडौल गद्यशैलीने नटलेल्या व्यक्तिचित्रांचा संग्रह. कै. पुरुषोत्तम मंगेश लाड यांचे हे व्यक्तिचित्र त्याच पुस्तकातून त्यांच्या अनुमतीने अनुवादित केले आहे. ]

**इंडियन** सिव्हिल सर्व्हिस (ईश्वर तिच्या आत्म्यास शांति देवो !) म्हणजे एखाद्या विक्राळ कापणीयंत्रासारखी होती. त्यात पडणाऱ्या अंमलदाराचे टोकदार कंगोरे केव्हाच कानसून निघत. त्याच्यातील सारा काटेरीपणा घासून–घसटून असा सफाईदार आणि गुळगुळीत होई, की त्यावर सत्तेची आणि अधिकाराची चाके निर्वेधपणे फिरत.

पी. एम्. लाडानीसुद्धा सत्तेचा आणि अधिकाराचा गाडा सुरळीतपणे आणि वेगाने हांकला, पण २९ वर्षे आय. सी. एस्. च्या कापणीयंत्रात काढूनहि त्यांचे कंगोरे झिजले नव्हते. प्रखर ध्येयवाद, जडता आणि मूढता याविरुद्ध बंडखोरी, उल्हास काय किंवा उद्वेग काय, त्यांची तात्काळ अभिव्यक्ति–हे त्यांचे काही पैलू. या खास पलूंमुळेच त्यांच्या सफाईदार अंमलासहि धार राहात असे; आय. सी. एस्. च्या कापणीयंत्राने हार खाल्ली ती तिथेच !

इतर सनदी नोकरांपेक्षा लाडसाहेब हरतऱ्हेने वेगळे होते, अशातली गोष्ट नाही. आय्. सी. एस.च्या पारंपारिक कलम-कौशल्यात ते चांगलेच पारंगत होते. जबाबदारी स्वीकारण्याचे आणि सांभाळण्याचे त्यांचे सामर्थ्य केवळ अमर्याद होते. कारभाराच्या बाबतीत केवळ सारासार विचाराची दृष्टि ठेवून त्यांचे समाधान होत नसे. तपशीलाचे बारकावे सुद्धा ते काळजीपूर्वक तपाशीत. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपले मंत्री आणि सरकार यांच्या धोरणाशी आणि तत्त्वांशी ते सदैव एकनिष्ठ असत. धोरण आखून देणे, एवढेच अंमलदाराचे काम असे त्यानी कधी मानले नाही. सरकारी धोरण कार्यान्वित करण्यातच त्यानी कर्तव्यपरायणता मानली. त्यामुळेच स्वतःला अंमलदार म्हणवून घेण्यात कोणताहि कमीपणा त्याना वाटला नाही; उलट सिव्हिल सर्व्हिसची परंपरा आणि प्रतिष्ठा यातच स्वतःचा गौरव त्यानी मानला.

मात्र श्रीमती लाड सांगतात, त्याप्रमाणे राजीनामा देण्याचा विचार त्यांच्या यजमानांच्या मनात अनेक वेळा डोकावून गेला. १९४२ साली ते जिल्हा न्यायाधीश असतानाची गोष्ट. त्या जिल्ह्यातील एका बड्या गोऱ्या अंमलदाराने जरा कुत्सितच त्याना छेडले, "गांधी उपवासातच मरण पावले आणि मार्शल लॉ पुकारावा लागला तर जज्जसाहेब काय करतील ?" लाडांनी तात्काळ उत्तर दिले, "न्याय आणि सुसंस्कृतपणा याना शोभेसेच वर्तन जज्ज करतील, लष्करशाहीचे नाही." पण एक गोष्ट तेव्हाहि जगजाहीर होती. ती ही की, असा दुर्दैवी प्रसंग ओढवता, तर त्यांच्या खिशात लिहून तयार असलेला राजीनामा तात्काळ सरकारच्या हाती पडता. गांधीजींबद्दल मनोमन श्रद्धा बाळगणारे हिंदी अंमलदार थोडे नव्हते, पण लाड जेवढे श्रद्धाळु होते, त्याहूनहि चिकित्सक अधिक होते. चिकित्सा आणि विवेचन यांच्या अग्नीत तावून सुलाखून मगच त्यांची गांधीजींवरील श्रद्धा दृढ झाली होती. १९३० साली कुणाहि उच्चपदस्य सरकारी अधिकाऱ्याने साबरमतीस जाणे म्हणजे हिंमतमर्दाइचे काम होते. पण लाड तेथे गेले होते. मात्र नंतर त्यांनी आश्रमवासी होण्याचा बेत बदलला. सरकारी नोकरीचा मोह सोडवेना म्हणून नव्हे, तर त्यांच्या चिरजिज्ञासु, चिकित्सक व्यक्तित्वास अशा आत्मसमर्पणाच्या चौकटीत बद्धमूल होणे कठिण होते म्हणून.

कोणत्याहि बंद चौकटीची चीड त्यांच्या स्वभावात, त्यांच्या बोलण्याचालण्यात, त्यांच्या कारभारात सतत व्यक्त होई. आणि म्हणूनच एक कर्तव्यपरायण आय. सी. एस्. अधिकारी असून ते त्या श्रेणीत अपवादरूप होते. ऑफिसरांचे सामाजिक जीवन एका विशिष्ट वर्तुळात सीमित राहते, बरोबरीच्या सरकारी अंमलदारात ही मंडळी खुल्या दिलाने वागतात, पण त्या वर्तुळाबाहेर मात्र संभावित पण अलिप्तपणे वागण्याची (Correct but distant) त्यांची वृत्ति असते. लाडांचे व्यक्तित्त्व मात्र सदैव खळखळणाऱ्या, स्फटिकासारख्या निर्मळ निर्झरासारखे मोकळ्या गतीने वाहत राही. अधिकाऱ्यांच्या बैठकीत, गांधीवादी काका कालेलकरांच्या संगतीत, फिल्मी दुनियेत, बौद्ध भिक्षूंच्या मेळाव्यात किंवा नास्तिकांच्या अड्ड्यातहि सर्वत्र स्वैरगतीने संचरणारी अशी ती सदानीरा, चिरशुभ्रा निर्झरिणी होती. जबाबदारीच्या ओझ्यांनी दबलेल्या अंमलदाराच्या भोवती बनावट रीतिभातींची एक भिंत उभी राहत असते; लाडांना या भिंतीने कधी घेरले नाही.

सन ५५ कि ५६ मध्य एक दिवस लाडसाहेब आणि मी हैद्रा-







## कै. पुरुषोत्तम मंगेश लाड

वादहून ७० मैल दूर असलेले रामप्पा मंदिर पाहण्यासाठी जात होतो. हैद्राबादमधील पुराणवस्तु खात्याचे एक कर्मचारी आमच्याबरोबर होते. लाडसाहेबांसारख्या बड्या अधिकाऱ्यांशी बोलताना त्या गृहस्थाच्या वागण्यात नम्रता आणि वाणीत अजीजी असणे स्वाभाविक होते. पण क्षणार्धात त्यांच्या संकोचाचा आणि बुजरेपणाचा बुरखा दूर करून, स्वतःच्या मनमोकळ्या स्वभावाचा आणि रंगदार, अनुभवसमृद्ध व्यक्तिमत्वाचा प्रत्यय लाडांनी दिला. त्यातच लाडांचे 'लाडपण' सामावलेले होते. ते गृहस्थहि चांगले रसिक निघाले. गप्पा चढत्या रंगतीने रंगल्या, रामप्पा मंदिराचे शिल्प, कोकणातील विठ्ठलभक्ति, प्राचीन कलेतील ढोबळ जीवनाचे चित्रण, जीवनातील कामतत्त्व, हाल-शातवाहनाची गाथासप्तशती, वात्स्यायनाची कामसूत्रे आणि कामशास्त्रातील आसने अशा नाना विषयांची इजेरी लागली. लाडांची विद्वत्ता अशी, की बेदरकार उधळत जाणेच तिला अवगत होते ! स्वतःच्या वैभवाचा अधिकार तिच्या गांवीहि नसे !! जॉन्सनने बर्कविषयी म्हटले होते की, अचानक आलेल्या पावसात निवाऱ्यासाठी म्हणून रस्त्यालगतच्या छपराखाली तुम्ही उभे राहिलात, आणि तेथे दहा-पाच मिनिटे बर्कशी संभाषण करण्याची संधि मिळाली, तर तेवढ्यातसुद्धा तुम्हाला पक्के उमगेल की ही स्वारी विलक्षण प्रतिभावान् आहे ! हैद्राबादहून रामप्पा मंदि-राची वाट पाच मिनिटांची असती, तरीहि त्या सद्गृहस्थांना लाडांच्या विलक्षण व्यक्तिमत्त्वाची चुणूक कळली असती. त्या ७० मैलांच्या प्रवासात त्याना त्या विलक्षणतेचा प्रत्यय तर आलाच पण जिव्हाळ्याच्या मैत्रीची झुळूकसुद्धा लाभली.

मैत्रीची 'अनंत हस्ते' उधळण ते करीत आणि मोबदल्यात काही मिळणार आहे का, याचा विचारहि त्यांना शिवत नसे. त्यांच्या जिज्ञासेच्या अथांग सागरावर हलकीशी लहर उमटवणारा परि-चयाचा एखादा चिमुकला किरणहि मैत्रीचा पूर्णचंद्र बनून जाई. त्या बळावर दुसरी व्यक्ति कदाचित् काही स्वार्थसिद्धी करू पाहील; पण लाडांचा स्वार्थ एकच. आणि तो म्हणजे आपल्या ज्ञानाच्या कक्षा विस्तारणे, आपल्या अभिव्यक्तीच्या चंचल नर्तनासाठी एक नवी रंगशीळा मिळविणे ! अशा 'मानस-मित्रां'ची संख्या वाढत राह्यची आणि मग त्यांचा राबता पण सतत असायचा. कुणा ज्योतिषीबुवांबरोबर चर्चा करत बसतील तर रात्री १२ चे ठोके पडले तरी भान नसे. एका खात्यातील कारकून पाली-प्राकृतचे व्यासंगी आहेत हे कळताच, त्याना बोलावणे गेलेच, आणि मग तासन्तास त्यांच्याशी चर्चा ! संस्कृत स्तोत्रात त्यांना विशेष रस असे. एकदा त्यांच्याबरोबर मद्रासकडे दौऱ्यावर होतो. दिवस-भर कामाची आणि बैठकी-मुलाखतींची झड लागून राहिली होती. मला वाटले, थकले असतील. पण नाही. रात्री शुभलक्ष्मींकडे बैठक होती. तिथे सुमधुर स्तोत्रांचा गजरा गुंफला गेलाच, पण जोडीला राग-रागिण्या, शंकराभरण आणि भक्तिसंगीताच्या प्रश्नांवर अशी रसाळ चर्चा झडली म्हणता ! बिहारीचा संदर्भ निघताच लगेच माझ्याकरवी एका हिंदी पंडितास पाचारण करून शंका-निरसन करून घेतले. एकदा राष्ट्रसंघाचे दिल्लीतील प्रतिनिधि मि. सोलेस एलोंजो प्रथमच भेटीसाठी आले. भेट घरीच ठरली आणि मीपण हजर होतो. ते क्यूबाचे आहेत, असे कळताच उंसाच्या शेतीची चर्चा निघाली. मला वाटले शिष्टाचार म्हणून क्यूबातील उंसा-साखरेच्या गोष्टी निघाल्या असतील. पण औप-चारिकतेचा जरासा स्पर्श नव्हता त्यात. उंसाच्या रसात त्यांना 'रस' असेल नसेल, पण त्या गप्पात ते एवढा रस घेत होते की, मध चोखणाऱ्या मधमाशीची आठवण व्हावी. कोणत्याहि मंडळीत वर्ग, पातळी, प्रवृत्ति असले आडपडदे झुगारून ते मिसळू शकत. याचे कारण असे मात्र नाही की 'मित्र कसे मिळवावेत' या चालू जमान्यातील सवंग कलेत ते सिद्ध होते. त्यांचे वागणेच सहज-भावाचे असे. ज्ञानलोलुप, रसलोलुप चित्ताची तहान भागविण्या-पलिकडे त्यांच्या स्नेहभावनेस स्वार्थाचा ईषत् स्पर्शहि नसे. म्हणूनच तात्काळ अंतःकरणे जोडली जायची.

कित्येक यशस्वी अंमलदार आपल्या खाजगी संबंध-संपर्कांच्या द्वारा आपापल्या खात्यांची कामे रेटताना दिसतात. आजकाल सर-कारी कामकाजातहि (खाजगी खटल्यांत तर विचारूच नका !)





अनुक्रमणिका

अन्य अधिकाऱ्याच्या सहानुभूतीवर आणि सद्भावनांवर विसंबून राहावे लागते. कोणत्याच खात्यास एखाद्या बेटाप्रमाणे अलग राहून प्रगति साधणार नाही; कधी अर्थखात्याचे मन वळवावे लागते, कधी पब्लिक सर्व्हिस कमिशनची मर्जी सांभाळायची असते, कधी गृहमंत्रालयाचा सल्ला मानावा लागतो तर कधी कायदा खात्याशी झटापट करायची असते. आणि दारे ठोठावण्याच्या या कलेस जर 'आप्तभावा'ची जोड मिळाली तर सोन्याहून पिवळे ! लाडसाहेब या कलेत दक्ष नव्हते. तशा, अधिकाऱ्यांशी ओळखी-पाळखी खूप होत्या, पण 'भाईचारा' किंवा सरकारी अंमलदारात परस्परां-विषयींचा जो 'आत्मभाव' असायचा त्यात ते निपुण नव्हते. त्यांच्या मैत्रीची बैठकच मुळी वेगळी ! त्यामुळेच की काय त्यांचे समकक्ष अधिकारी त्याना एक अजब प्राणी मानीत. भडका उडाला, हरकत नाही, तिर्कस सवालाचे उत्तरहि तितकेच तिखट मिळेल. पण शिष्टाचाराच्या नांवावर मोक्याच्या क्षणी मौन राखणाची, मूग गिळून बसण्याची कला त्याना अवगत नव्हती. अशा माण-साला अन्य अंमलदारांशी 'आत्मभाव' कसा राखता येणार ? शत्रुत्व नसे, पण लोक कुजबुजत. त्यांच्याबद्दल चर्चा चालायची, चुगल्याहि व्हायच्या; एकंदरीत हा आपल्या पंक्तीतला नव्हे असाच समज त्या मंडळींचा असावा.

आणि तरीहि आपल्या खात्यास प्रगतीच्या प्रशस्त मार्गावर पुढे नेण्यात त्यानी यश मिळविले. माहिती आणि नभोवाणी खात्याच्या विकासाच्या अनेक योजना त्यानीच सुचविल्या. सुच-विल्या एवढेच नव्हे तर त्यातील बहुतेक प्रत्यक्षात उतरविल्या. आकाशवाणीत साहित्यिकांच्या आणि कलावंतांच्या नेमणुका, फिल्म्स डिव्हिजनद्वारा बुद्धजीवन, राधा-कृष्ण इ. सांस्कृतिक अनुबोधपटांची निर्मिती, गीत आणि नाट्य विभागाची (सॉंग अँड ड्रामा डिव्हिजन) स्थापना, देशभर फील्ड-पब्लिसिटी-युनिट्सचे जाळे, दृश्यसूचना आणि प्रदर्शनविभागाची सुरुवात, प्रकाशन-विभागातर्फे कला आणि साहित्यविषयक ग्रंथांचे प्रकाशन, गांधी-रचनावलि संकलनाची योजना, बाल-चित्रपट-समितीची स्थापना अशा नानाविध कार्यक्रमांचा सूत्रपात त्यांनी केला. डॉ. केसकरांची स्वप्ने प्रत्यक्षात आणण्यासाठीहि ते असेच झटले. उणीपुरी तीन वर्षे ते या खात्याचे सचिव होते आणि तेवढ्यातच अशा नाना योजनांचे सुईणपण त्यानी केले.

या अपूर्व कार्यसिद्धीचे रहस्य कशात आहे असा प्रश्न साहजि-कच मनात येतो. 'टॅक्ट', भाईचारा आणि लाडीगोडी यात ते निष्णात नव्हते. तरीहि सरकारी मंत्रालयांची सुस्ती, अंमलदारांचे औदा-सिन्य आणि खात्यातील दप्तरदिरंगाई त्यांच्या कामाचा झपाटा मंदावू शकली नाहीत. सकृद्दर्शनी त्यांची दोन कारणे सुचतात. एक कारण, म्हणजे फाईलींवरील त्यांच्या नोट्स या मुद्देसूद मांडणी आणि चिकित्सा याबाबतीत बिनतोड असत. आपल्या खात्याची मागणी ते अशा ढंगाने मांडीत की प्रतिपक्ष निरुत्तर व्हावा. त्यात भाषावेश किंवा शब्दांचा फुलोरा नसे. कांटेतोल विधाने आणि 'केस'च्या समर्थनासाठी आवश्यक तेवढीच मोजकी माहिती ठाकठीकीने ते मांडीत असत. कशाचा उल्लेख नको, हे ते अचूक हेरीत. त्यांच्या यशस्वीतेचे दुसरे कारण मात्र बिलकुल याच्या उलट होते. कागदपत्रांवर शेरा लिहिताना ते जेवढे सावध आणि मितभाषी असत, तेवढेच संभाषणात जोरदार आणि आवेशपूर्ण असत. एखाद्या वादळासारखे ते मीटिंगमध्ये येत आणि मग त्यांच्या मागण्याना वाटाण्याच्या अक्षता लावण्यास किंवा त्यांच्याशी दोन हात करण्यास अर्थखात्यासारखा धुरंधर विभागहि धजत नसे. कधी वाटे की हे व्यर्थ वक्तृत्व गाजवीत आहेत, एखादी छोटी लढाई जिंकण्याच्या धुंदीत मोठ्या योजनांकडे दुर्लक्ष तर करत नाहीत, असाहि विचार मनात येई. एखादे वेळी अगदी वाट लागे की छे, वाहवलेच लाडसाहेब ! आणि असं सारं घडलं तरी चर्चा संपून जेव्हा कागदावर निर्णय लिहिले जात, तेव्हा सर्व काही त्यांच्याच म्हणण्यासारखे ठरल्याचे आढळून येई ! मग तो आवेश नि ओरडा, झकझक नि झगडा, आपली 'केस' फत्ते होण्यासाठी, मनाशी रचलेल्या व्यूहाकडे इतरांचे लक्ष जाऊ नये, म्हणून मुद्दाम रचलेला असे की काय नकळे !

लेखनपटुता आणि वाग्वैभव ही दोन्ही वास्तविक स्थूल कारणेच मानावी लागतील. जरा बारकाईने विचार केला की त्यांचे आणखी दोन गुण ध्यानात येतात; त्यांची मेधाशक्ति प्रबल होती आणि त्यांचा उत्साह अदम्य होता. सहा वर्षांचे असताना

त्यांची आई गेली आणि कोकणातील एका आडगांवी आजोबांच्या कडक देखरेखीखाली त्यांच्या मनाची घडण झाली. मुंबईत आल्यावर चिकित्सक समूह हायस्कूलच्या प्रिन्सिपॉल नरुरकरांनी त्यांच्यातील प्रतिभेची पारख केली आणि उत्तेजन दिले. वय कमी असल्याने वर्षभर प्रवेशपरीक्षेसाठी थांबावे लागले. मग त्यांनी वाचनावर झोड उठवली. त्यामुळे पुढील वर्षी परीक्षेत पहिले आले ! त्यानंतरच्या सर्वच परीक्षात ते पहिले येत गेले. अगदी नोकरीत शिरल्यानंतरहि, बॅरिस्टर होण्याच्या हेतूने विलायतेस गेले, तेव्हाहि पहिला नंबर सोडला नाही !

अशा प्रतिभेची उदाहरणे आय्. सी. एस्. मध्ये आणखी होती. पण प्रतिभेस उत्साहाची अशी जोड क्वचितच आढळली. किंबहुना उच्चश्रेणीच्या सरकारी अंमलदाराने कोणत्याहि विषयाबाबत विशेष उत्साह दाखवू नये, असा अलिखित संकेतच असल्यासारखे आहे. एखादी योजना कल्याणकारी आहे ना, ठीक आहे; एखादे उद्दिष्ट आदर्शवादी आहे म्हणता, असू दे. अधिकारी त्या योजनेच्या यशासाठी वा त्या उद्दिष्टाच्या पूर्तिसाठी कष्ट करतील, हे स्वाभाविकच आहे. पण उत्साह ? आत्मीयता ? छे, सनदी अधिकाऱ्यास न साजेसेच शब्द ते ! जणू त्यांच्या कक्षेबाहेरच्याच गोष्टी त्या. भावनाशीलता आणि ध्येयवाद अंमलदाराच्या कामात व्यत्यय आणतात, म्हणून त्यांचा संसर्ग टाळता येईल तेवढा चांगला अशीच वृत्ति. आपल्या भावना लपविण्यातच सिव्हिलियनाचे यश साठलेले असते म्हणे. लाडांनी आपल्या आयुष्यात या संकेताचे सदैव उल्लंघन केले. विशेषतः स्वातंत्र्य प्राप्तीनंतर तर त्यांची ही वृत्ति अधिकच बळावली. श्रीमती लाड सांगतात की, ते नेहमी म्हणायचे की, स्वतंत्र भारताची सुरुवातीची वर्षे म्हणजे पायाचे दगड, आणि ते चिरेबंद बसावेत म्हणून झिजण्यातच त्यांच्या पिढीची कृतार्थता आहे !

आकाशवाणीत माझी नियुक्ति होण्याआधी त्यानी मला मुलाखतीसाठी बोलविले होते, तेव्हाच त्यांच्या प्रखर ध्येयवादाचा पहिला प्रत्यय मला मिळाला. वास्तविक केंद्र सरकारच्या एका सचिवोत्तमाच्या भेटीसाठी मी गेलेला; पण मला भेटला तो आदर्शानी उचंबळणारा, सामान्य जनतेच्या हिताचा जागरूकपणे विचार करणारा, नि नवनिर्मितीसाठी उत्साहाने झटणारा असा एक स्वप्नद्रष्टा की, ज्याच्या सान्निध्यात मला सत्ता किंवा शासनपटुता यांचा अनुभव येण्याऐवजी, एका स्फूर्तिदायी शक्तीचा परिचय झाला. आकाशवाणीचे कार्यक्रम कुणासाठी तयार व्हायचे हा विषय निघाला. "मोठमोठ्या शहरांतील इंग्रजी विद्याविभूषित नि पाश्चात्य संस्कृतीने रंगलेल्या नागर स्त्रीपुरुषांसाठी हे माध्यम नाही.... दिल्लीचे कृत्रिम वातावरण आपली मापकाठी म्हणून घेता येणार नाही. . . भारतीय भाषात अनंत भांडार भरलेले आहे, पण आजच्या समाजनेत्यांची तिकडे अभिरुची नाही." लाड कळवळ्याने बोलत होते. मग लोक-संगीत आणि लोकसंस्कृति यांचा विषय निघाला. त्यांच्या शब्दाशब्दांतून लोककलांच्या सर्जकांची, कलावंतांच्या चित्तांची धडधड स्पष्टपणे स्वरित होताना मला जाणवली.

मागाहून मला जाणवले, की, त्यांचा हा उत्साह म्हणजे भावाळू ध्येयवादाचा क्षणिक उमाळा नव्हता— अशांची आपल्याकडे कमतरता नाही. उलट प्रत्येक प्रगतीशील कार्यक्रमाबद्दल निराश आणि अनास्थेवाईक वृत्तीने सतत शंका घेण्यात, त्यावर टीकाटिप्पणी करण्यात ही मंडळी दंग असतात. लाडांचा उत्साह म्हणजे कार्यमग्नता आणि तत्परता यांचा अनावर लोंढा. त्याच्या मुळाशी होता खोल, खराखुरा अनुभव. अनुभवाची ही जातिवंत सचोटी त्यांच्या उत्साहरूप शक्तिपुंजास त्यांच्या विशिष्ट कार्यप्रणालीत परिणत करी, आणि त्यामुळे ज्या लोकांचा त्यांच्याशी संबंध येई, ते सारे त्याना हातभार लावायला लगेच राजी होत. प्रथम जेव्हा आम्ही आकाशवाणीवर लोकसंगीताचा खास कार्यक्रम नियोजित केला, त्या दिवशीची गोष्ट घ्या. स्वतः पंतप्रधान त्यासाठी उपस्थित राहिले. येताक्षणीच ते उद्गारले, "लाड, शेवटी तुम्ही मला ओढून आणलेतच इथे." आणि या तक्रारीच्या सुरातील लाडिकपणा आणि कौतुक स्पष्टपणे सांगत होती, की लाडांचा कृतनिश्चयी बाणा पंतप्रधानांनी ओळखला आहे. भगवान् बुद्धांची २५ वी जन्मशताब्दी साजरी करण्यासाठी जो चित्रपट तयार करण्यात आला, त्यासंबंधात श्री. खन्नांचा त्यांच्याशी संबंध आला. ते तर चकितच झाले. रात्ररात्र पटकथेच्या साहित्याची जुळणी होत राही, त्याच्या प्रत्येक पैलूवर साधक-बाधक विचार होई. बौद्ध साहित्य आणि प्राचीन कलांचे पुरे मंथन झाले त्यावेळी ! अद्भुत होती त्यांची कार्यनिष्ठा आणि विलक्षण अशी धुंदी ! कोणत्या अचाट प्रेरणा त्याना अशा अदम्य कष्टांसाठी उद्युक्त करीत कोण जाणे ! आणि हे सारे कॅन्सरसारख्या दुराराध्य रोगाने देहात ठाणे मांडले आहे, आपण आता काही महिन्यांचेच पाहुणे आहोत हे कळून संवरून ! बुद्धचरित्रावर तयार केलेला 'चित्र संग्रह' तर जवळजवळ लाडांच्या एकटयाच्याच परिश्रमाचे फळ होय.

गंमत अशी की कष्ट आणि काम यातच त्यांना तृप्ति लाभे, त्यामुळे लाभणाऱ्या प्रशंसेत किंवा जनतेकडून होणाऱ्या मान-

बरं का बंड्या, माती स्वच्छ आहे ना ?

अनुक्रमणिका

सन्मानात सहभागी होण्यासाठी ते उत्सुक नसत. वृद्ध चित्रसंग्रहात त्यांचे नांव कुठे नमूद व्हावे, असे त्याना चुकूनहि वाटले नाही. १९५४ मध्ये पहिल्या नाटयोत्सवासाठी मी पाटण्याहून दिल्लीस आलो होतो. सप्रू हाऊसमध्ये त्यांची माझी प्रथम गांठ पडली. त्या महोत्सवाचे बरेचसे श्रेय त्यांच्याकडे जाते. पण पाहिले तर स्वारी मागच्या रांगेतील एका खुर्चीवर बसलेली. ही एक त्यांची खोडच म्हणायला हवी. रेडिओ संगीत संम्मेलनातहि त्यांची मूर्ति पहिल्या रांगात कधीच नसायची. उत्सवाच्या सिद्धीसाठी ते सर्वांपुढे खपत असायचे, पण जेव्हा रंगमंचावर बसण्याची घटका जवळ येई, तेव्हा त्यांच्यासाठी शोधाशोध करावी लागे !

एका बाजूस अशी शालीनता आणि विनय आणि दुसरीकडे प्रखर उग्रपणा आणि आवेग असा लाडांच्या स्वभावातील विरोधाभास होता. परस्परांशी न जुळणाऱ्या धारणांची आणखीहि काही उदाहरणे त्यांच्या जीवनात आढळतात. गोव्यातील कुलदैवत श्रीमंगेशावर त्यांची श्रद्धा होती, पण विलायतेहून आल्यानंतर प्रायश्चित्त घेतल्याशिवाय पूजा-अर्चा करता येणार नाही, म्हणून पुजाऱ्यांनी सांगताच त्यानी त्याला साफ नकार दिला. एकीकडे बौद्ध दर्शनाचा सूक्ष्म अभ्यास आणि धर्मानंद कोसम्बींचा सहवास, आणि दुसरीकडे तुकारामांच्या अभंगाचे संपादन करण्यात व्यतीत केलेली आयुष्यातील अनमोल वर्षे ध्यानात घ्या. तुकारामाविषयींच्या ग्रंथाचे प्रकरण पुरे करण्यासाठी मृत्युशय्येवरहि ते तळमळत होते. मृत्युपूर्वी काही दिवसच मुंबईच्या त्या रुग्णालयात पाहिलेले ते दृश्य, त्यांच्या मित्राना कधीच विसरता येणार नाही. पलंगाच्या चारी बाजूस पुस्तके विखुरली होती. भेटायला येणाऱ्यांची ये-जा चालूच होती. फादर मॅस्कारेन्हेसना बोलावले होते. तुकारामांचे वैकुंठगमन आणि ख्रिस्ताचे स्वर्गारोहण यासंबंधी तात्त्विक आणि गूढवादी दृष्टिकोणातून त्यांच्याशी चर्चा करायची होती. मस्तक एखाद्या अदभुत यंत्रासारखे काम करीत होते, रोगजर्जर देहयंत्र मात्र मंद पडत चालले होते. पण त्या कर्मयोग्याची दीपशिखा ज्वलंत होती. जागृत होती.

त्यांचे अंतिम दर्शन मला लाभले नाही. दिल्लीहूनहि ते गुपचूप रवाना झाले होते. ही यात्रा शेवटचीच याची मनोमन जाणीव असूनहि, कोणत्याच प्रकारचे भावनांचे प्रदर्शन आणि जाहिरात त्याना नको होती. आपल्या साऱ्या सहकाऱ्याना एकच निरोप त्यानी सांगून पाठवला, "आपल्या सर्वांच्या सहकार्याबद्दल मी कृतज्ञ आहे."

केवळ हेच मोजके शब्द ! निरोप घेणे नाही आणि हारतुऱ्यांची अपेक्षा नाही. जेव्हा जेव्हा मी त्यांच्याकडे जाई, तेव्हा तेव्हा संपन्न, समृद्ध होऊनच माघारा फिरत असे—नवे विचार, नव्या प्रेरणा, नवीन माहिती साऱ्याची शिदोरी लाभे. पण याखेपेस लाड गेले, ते अशा लगबगीने की काही बोलता आले नाही, काही करता आले नाही. ● ● ●

[या लेखासाठी श्रीमती लाड यांनी सांगितलेल्या काही माहितीचा उपयोग केला आहे- लेखक]



## "मटका"

एक खट्याळ श्रीमंत बाई आपल्या खोलीच्या खिडकीजवळ उभी होती. समोरच एका वकिलाचे ऑफिस होते. बाईसाहेबांची सहज त्या खिडकीकडे नजर गेली आणि त्या चपापल्या. त्यानी एकदा डोळे चोळले आणि पुन्हा पाहिले. होय. त्यात काही वाद नाही. एक तरुण स्त्री वकीलसाहेबांच्या मांडीवर बसली होती. त्यांची टायपिस्ट असावी.

बाईसाहेबानी लगेच टेलिफोन डिरेक्टरी पाहून वकीलसाहेबांचा टेलिफोन नंबर शोधून काढला. आपली नजर वकीलसाहेबांवर ठेवून त्यानी त्यांचा नंबर फिरवला. वकिलसाहेबानी रिसीव्हर उचलला—"हलो," ते म्हणाले.

"हलो !" बाई म्हणाली. "काय चाललंय, वकील साहेब?"

वकील दचकला.

"मला वाटलंच तुम्ही दचकाल म्हणून," बाई म्हणाली.

वकिलाने झटकन् त्या मुलीच्या कमरेभोवती असलेला आपला हात काढून घेतला.

"हं !" बाई म्हणाली. "तो हात काढून घेतलात हे बरं केलत. पण असं पहा, वकीलसाहेब, खोलीत आणखी इतक्या खुर्च्या असताना..."

वकील साहेबानी झटकन् आपल्या मांडीवर बसलेल्या मलीला दूर ढकलून दिले.

"हं !" बाई म्हणाली. "हे बरं केलत. म्हणजे आता तुम्हाला आरामात बसता येईल."

"को — को — कोण बोलतय् हे सगळं ?" वकिलाने गडबडून विचारले.

"मी," बाईसाहेब खोल, धीरगंभीर आवाजात म्हणाल्या, "तुझी सदसद्‌विवेक बुद्धि बोलते आहे."

☆ ☆ ☆

लहान गाव :— जिथे दुपारी शाळामास्तरचे काम करणारा माणूस सकाळी आणि संध्याकाळी पोस्ट-मास्तरचे काम करतो.

श्रीमंत माणूस:— ज्याच्याजवळ बराच पैसा आहे असा गरीब माणूस.

लग्न झालेला माणूस :— पोस्टाची पेटी दिसताच खिसे चाचपून पाहतो तो.

ब्रह्मचारी माणूस :— ज्याला सर्व प्रश्नांची उत्तरे माहीत असतात पण ज्याला कुठलीहि स्त्री प्रश्नच विचारीत नाही तो.

—वि. रा. भाटकर





# मी दुसरे कुटुंब करतो याने वरपरीक्षा

—राजाराम हुमणे

जेमतेम महाबळेश्वरची हवा चाखायला मिळणारा सामान्य इसम दैवयोगाने इलायतेला जायला निघतो....आणि विमानापेक्षाही भीतिदायक वाटणारे मधले जंजाळ त्याचा पार खिमा करते.....कुठले परदेशगमन सुचले असे त्याला होते. पण घडले मात्र आगळेच....

**एकपत्नी** रामाचे नांव घेऊन एकाच कुटुंबाला चिकटून रहाण्याचे मनात असूनहि गेली काही वर्षे दुसरे कुटुंब करण्याचा मोह मला होत होता. वामन पंडितासारख्या भारतीय पंडित कविपासून विंडेल विल्कीसारख्या पाश्चात्य विद्वानापर्यंत अनेकांनी हे वेड माझ्या डोक्यात भरवलं होतं ते कुणाला, सांगूनहि खरं वाटायचं नाही. दुसऱ्या कुटुंबाचं मला इतकं आकर्षण वाटू लागलं की गेली कित्येक वर्षे हे कुटुंब मिळविण्यासाठी मी जिवाचा आटापिटा करीत आलो आहे. परंतु भारतीय माणसाला सहजासहजी दुसरं कुटुंब मिळणं किंवा मिळविणं एकंदरीत कठीणच.

आपला आणि विशेषतः आमच्या पहिल्या कुटुंबाचा गैरसमज होऊ नये म्हणून माझ्या मनात असलेल्या दुसऱ्या कुटुंबाविषयी सारं काही सांगून टाकावं म्हणतो. खरं म्हणजे दुसरं कुटुंब करण्याची कल्पना पहिले कुटुंब करण्यापूर्वीच म्हणजे बालपणीच माझ्या मनात डोकावून गेली होती. मला हवं असलेलं दुसरं कुटुंब म्हणजे दुसरं तिसरं कुणी नसून 'वसुधा' होय ! 'वसुधैव कुटुंबकम्' करण्याचा विचार प्रथम 'केल्याने देशाटन' ही वामनपंडिताची कविता वाचल्य बरोबरच मनात आला होता. आपण जगप्रवास करावा, पृथ्वीला प्रदक्षिणा घालावी असं तेव्हापासूनच मला वाटू लागलं. नंतर सारं जग आता एकच झालं आहे, देशांदेशातील अंतर कमी झालं आहे आणि पृथ्वीतलावरील प्रत्येक प्राणी हा या विशाल जगाचा नागरिक आहे अशी 'वन वर्ल्ड'ची कल्पनाहि गाजराप्रमाणे माझ्या डोळ्यांपुढे नाचू लागली.

घारापुरीची किंवा कार्ल्याची लेणी पाहण्यासाठी गांवाची वेस ओलांडल्यावर आम्ही कृतकृत्य व्हावं. वर्षाकाठी माथे-

रानला किंवा महाबळेश्वरला आपले हात स्वर्गाला पोहोचले असं आम्हाला वाटावं. दिल्ली आम्हाला हमेशची 'बहोत दूर' वाटावी आणि दिल्लीच्या देहलीला पाय लागले की अटकेपार झेंडा फडकवल्याचा टेंभा आम्ही मिरवावा. पणजीपर्यंत जल-प्रवास केला की सातासमुद्रापलिकडे गेल्या-सारखे आम्हाला वाटावे ! बस्. आम्हा मध्यमवर्गीयांची धांव या कुंपणापर्यंतच. पॅरिस आणि लंडन हे आम्ही फक्त विमान कंपनीच्या जाहिरातीत किंवा नकाशावर पहायचे. परदेशगमनाचा योग फक्त कुंडलीच्या घरात किंवा चौकटीत. तो घराचा उंबरठा किंवा दाराची चौकट सोडून कधी बाहेर पडायचा नाही. परंतु तरीहि विलायतची वारी करावी, पश्चिमेकडची हवा खावी असं फार वाटायचं. मडकी फोडावीत किंवा फडकी फाडावीत पण प्रसिद्धपुरुष व्हावे या चालीवर 'येन केन प्रकारेण' 'एफार' व्हावे असे मला फार वाटायचे. त्यामुळे मी केव्हा एकदा भारताची सीमा ओलांडतो आणि 'इये साहेबाचिये नगरी' जाऊन येतो असं मला झालं होतं. परदेशात जाऊन आपण परत आलो आहोत. अंगावर नखशिखान्त पाश्चात्य वेश परिधान केलेला आहे, आणि तोंडात पाईप धरून जो भेटेल त्याला 'जेव्हा मी इंग्लंडमध्ये होतो—' अशी ठरीव आणि ठाशीव सुरुवात करून तेथील शिजविलेल्या मांसाला मसाला लावीत तिथल्या रोमहर्षक कथा बोबडया शब्दात आपण सांगतो आहोत अशी स्वप्नं मी रोज पहात होतो.

आपण रोज अशी स्वप्नेच पहात बसणार — परदेश मात्र आपल्याला कधीच पहायला मिळायचा नाही अशा निराश आणि उदास मनःस्थितीत असताना कुणीतरी मला आशेचा किरण दाखविला. पश्चिमेकडे सूर्य उगवला ! 'आंतरराष्ट्रीय देवाण-घेवाण प्रकल्पा'खाली तुला परदेशात सहज जाता येईल असं कुणीतरी मला सुचविलं. मी ताबडतोब त्या योजनेच्या संचालकाकडून नियुक्त नमुन्याचा अर्ज मागवून घेतला. पश्चिमेकडे डोळे लावून मी तो अर्जाचा नमुना वाचला आणि माझे डोळेच पांढरे होण्याची पाळी आली. पंधरावीस पानं आणि शंभरसव्वाशे प्रश्न असलेला तो अर्ज भरणे म्हणजे एक मोठे दिव्य होते. मोजके प्रश्न विचारून माण-साचं मोजमाप करण्यापेक्षा वारेमाप प्रश्न करून माणसाचे माप घेण्याची ही विचित्र तऱ्हा पाहून माझे डोके भडकून आणि भणाणून गेले. तो अर्ज भरायचा म्हणजे जन्मापासून आजच्या क्षणापर्यंत जगलेल्या सर्व आयुष्याची उजळणी करायची. त्या अर्जाचा एक एक स्तंभ पाहून मी स्तंभित झालो. ती प्रश्नावलि संपूर्णपणे भरायची म्हणजे आयुष्याची खडान् खडा माहिती द्यायची ! म्हणजे एक एक खडा टाकीत रांजण भरायचा ! एकदा मला असंहि वाटलं की ही प्रश्नावलि भरण्या-साठी जितका वेळ लागेल तेवढ्या वेळात आपण अनंत वेळा पृथ्वी प्रदक्षिणा करून येऊ. एकदा असं वाटलं की या शंभर प्रश्नांची उत्तरे भरण्यापूर्वी आपली शंभर वर्षे भरायची. परंतु या वाकडया तिकडया प्रश्नांतून परदेशाचा सरळ मार्ग जात असल्यामुळे प्रश्न पत्रिकेला उत्तर देण्या-खेरीज दुसरा मार्गच उरला नव्हता.

त्या प्रश्नावलीत जे अनेक चित्रविचित्र प्रश्न दिले होते त्याना मी माझ्या अक्कल हुशारीप्रमाणे प्रामाणिक उत्तरे दिली. कारण त्याना प्रामाणिक उत्तरांचीच अपेक्षा होती. ही उत्तरे त्याना पटली तर मी उत्तीर्ण होणार होतो. न पटली तर दुसरे कुटुंब पटकावण्याच्या कल्पनेची उत्तरक्रिया अटळ होती. थोडक्यात ती प्रश्नावली म्हणजे एक प्रकारची वरपरीक्षाच होती. ही वरपरीक्षा मी कशी दिली, याची आपल्याला कल्पना यावी म्हणून त्या प्रश्नावलीतील काही इरसाल प्रश्न व त्याला दिलेली सालस उत्तरे आपल्याला सांगून टाकतो.

**प्र. १** : आपली जन्मतारीख कोणती ? आपले जन्मस्थळ कोणते ? आपल्या जन्मस्थळातील वातावरणाचा आपल्या जीवनावर काही परिणाम झाला का ?

माझी जन्मतारीख २९ फेब्रुवारी १९२२, फेब्रुवारीत २९ तारीख असू शकते परंतु ती फक्त 'लीप यिअर'लाच. १९२२ हे लीप यिअर नसल्यामुळे अर्थातच ही जन्म तारीख चुकीची नोंदली गेली आहे हे उघड होय. तरीहि शाळेच्या दाखल्यात, मॅट्रिकच्या सर्टिफिकेटमध्ये आणि ऑफि-सच्या रेकॉर्डवर हीच तारीख नोंदली गेली आहे. विशेष म्हणजे गेल्या ४०–४२ वर्षांत ही चूक कुणाहि महाभागाच्या लक्षात आली नाही. आपल्यालाही ती समजली नसती आणि मलाहि ती आपल्या लक्षात आणून देण्याचे प्रयोजन नव्हते. परंतु आपण उमेदवारांच्या निवडीसाठी ठराविक वयोमर्यादा घालून दिली आहे. माझा जन्म १९२२ चा नसून १९२४ चा आहे असं प्रामाणिकपणे सांगितलं तर आपण खरे मानाल याबद्दल खात्री वाटते.

माझे जन्मस्थळ पुण्याजवळील खोपोडी गांव. भामटयांची वाडी म्हणूनहि हे गांव प्रसिद्ध आहे. भामटयांच्या वाडीत जरी मी जन्मलो असलो तरी भामटयांचा आणि माझा कधी संबंधच आला नाही. भामटा नकटा असतो की नाकेला असतो, काळा असतो की गोरा असतो हे मला माहित नव्हते. मी मोठा झाल्यावर मला माझ्या जन्मग्रामाचा इतिहास माहिती झाला. त्यामुळे भामटयांचे माझ्यावर काहीहि संस्कार झालेले नाहीत. तसे असते तर मी पदवीधर झालोच नसतो: पदवी न मिळविता मी गब्बर झालो असतो. एखाद्या चोरटी आयात करणाऱ्या आंतरराष्ट्रीय टोळीचा नायकहि झालो असतो. आणि एव्हाना परदेशच्या (आणि कदाचित् तुरुंगाच्याहि) अनेक वाऱ्या केल्या असत्या आणि आपण मला परदेशाला पाठवावे असा विनवणी अर्ज करण्याचा प्रसंगहि आला नसता.

**प्र. २**: आपल्या वडलांचा पेशा काय? वडलांच्या व्यवसायाचे आपल्या जीवना-वर परिणाम झाले का? झाल्यास कोणते?

( पृष्ठ ४१ वर पहा )











अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट






—सौ. हिरा कर्नाड

**वेणा सुरू झाल्या आहेत. आता प्रसवकाल येईल असं वाटतं.... ती अखंड व्यथा... ती तळमळ.... डोळ्यांतील विचारांचा गुंता वाढतच जातो .... कां नि कसे हे दोन प्रश्न गरगरून सोडतात ....**

**वेणा** सुरू झाल्या आहेत. आता प्रसवकाल येईल असं वाटतं. एक असह्य, दीर्घ वेदना. दुखणारी. अतोनात तळमळायला लावणारी. सारं देहभान विसरू लावणारी. जगाला विसरविणारी ती अखंड व्यथा. ती तळमळ......

पोटात गोळा उठतो. जीव कासावीस होतो. हृदयाचं स्पंदन आणखीच जोरानं वाढू लगतं.

पुढ्यातले पांढरेशुभ्र कागद आणि... आणि हातातली लेखणी. दोन्हीहि उत्सुक असतात—टिपायला नि टिपून घ्यायला ! डोक्यातला वाढत जाणारा विचारांचा गुंता बेचैन करतो. ही गुंतावळ हळुवार हातानी अलगद सोडवायला हवी. बोटं गुंत्यात मिसळतात. लिहायला शिवशिवतात. आणि उकल करू लागणार इतक्यात दारावर टक्टक् होते.

. . . अं ? आता या अवेळी कोण आलं ? कशाला आलं ? अस्सा राग येतो कधी कधी! भलत्या वेळी भलतंच कुणी——

——प्रसववेदनानी अवघडलेली ती उठून दार उघडते. दारात तो उभा असतो.

"ओ हो ऽ या कविराज ! फारा दिवसांनी आठवण झाली म्हणायची !" दिल्खुलास हंसून स्वागत केलं जातं. त्याच्या ओठांवर मात्र उसनं हंसू ! उसने पैसे घेतल्यासारखं !

"अग, काय करू मधुमालती, हल्ली सवडच होत नाही. कधीपासून तुझ्याकडे यावं म्हणत होतो."

"हुंऽ. . . .म्हणून एक वर्षानं बरी आठवण झाली येण्याची !"

"आठवण झाली नव्हे, आठवण करून दिली म्हण !"

"अस्सं ? पण कुणी ?"

"त्या तुझ्या दिवाळी अंकानी !"

"काय ? छान ! . . . पण काय रे, फक्त नांवच वाचली नाहीस ना ? जोडीला कथांचंहि वाचन झालं की नाही ?"

"झालं ना ? पण खरं सांगू मधु, मला ह्या वर्षीचं कथालेखन फारसं आवडलंच नाही. म्हणजे असं की त्यात काही जिवंतपणाच वाटत नाही ग ! नुसता चोथाचं. तीच तीच मिळमिळीत कथानकं नि त्यांची अस्ताव्यस्त गुंफण, मध्येच कुठंतरी संग्राम नि मग उकल. जुन्या आजीबाईंनी नवी वेषभूषा पेहरून देवळातून क्रीणांगणावर बॅडमिंटन खेळायला यावं तसं काहीसं !"

"कवि शोभतोस खरा !"

"न शोभून करता काय ? खरं सांगू का मधु, हा ठराविक पेहराव नि ठराविक सांचा. फक्त मुखवटे बदलून या कथा भेटायला येतात. खरं ना ?" . . एक झोंबणारा, तिखट प्रश्न.

"कुणास ठाऊक बाई !"— उदास, खिन्न उत्तर.

"कुणास ठाऊक ? कमालच करतेस तूहि ! आता तुझीच 'सुस्मिता'च्या दिवाळी अंकातली ती 'प्रमाद' कथा घे. कथेची सुरुवात करतानाच शेवट ठरवून घेतल्यासारखा सांचा तयार होतो. नि आगगाडीचे डबे जोडल्यासारखी कथा झुक्झुक् करीत पुढं जाते. एकाच मार्गानं, अर्थात् कधी खोल बोगदा, कधी पूल. —हा उंचसखलपणा, यतो; नाही असं नाही.

पण तुझ्या कथा खोली गाठत नाहीत. त्या वरवरच्या वाटतात. मनाला पटत नाहीत. . . . "

कथेची खोली अजमावताना तिचा दम आणखी कोंडला जातो. श्वास मोकळा सोडण्यासाठी तिलाच आपली खोली गाठून आता स्वस्थ पडावंसं वाटतं. वेदना एकाएकी बंद पडतात. श्वास वरखाली होतो.

"मधु, तू रागावणार नसशील तर सांगतो. . . ज्या अनुभवातून पर्स्पेक्टिव्ह दिलेले असते, स्थलकाल—संबद्धता गळून पडून त्याला प्रतीकात्मक रूप लाभत असते तेच एका दृष्टीनं कथात्व ! तुझी कथा फुलत नाही मधु! एकच एक कल्पना स्थलकाल संबंध विसरून इतकी फुलवावी, इतकी फुलवावी की. . . . . "

"फुलून फुलून त्या फुलाच्या पाकळ्या चुरगळाव्यात. विस्कटलेल्या पाकळ्याच कुस्करून गळून पडाव्या अन् हातात नुसता देठच रहावा असंच की नाही ?"

मधु संतापानं थरथरत खुर्चीतून उठते. उभी राहते. खोलीत जाऊन पडावंसं तिला वाटतं.

'प्रमाद' ही कथा किती वेगवेगळ्या रंगढंगानी आपण फुलविली. तरी हा फुलतच नाही म्हणतो ?

त्याची टकळी सुरूच असते. . .

"...आशय, अभिव्यक्ति, निवेदन सारं सारं ठराविक टाइपचं असतं हल्ली ! उथळ उथळ. केवळ घटनाप्रधान नाही तर कथानकप्रधान. काही मनोविश्लेषणात्मक, काव्यात्मक अशी कथा जुळवायला हवी...." तो तावातावानं बोलत असतो. फक्तच बोलत असतो. कथेबद्दल कृतीतून उतरावयाचं म्हणजे निव्वळ केळं सोलून खाल्ल्यागत सोपी गोष्ट वाटत असावी त्याला !

कधी कधी असं होतं. उगाच. गोष्ट चांगली म्हणून करू जावी नि ती नेमकी वाईट ठरावी. कारण वाईट म्हणणं फार सोपं आहे. नि सोपं नाहीहि. ते फार म्हणजे फारच कठीण आहे. खडतर आहे. स्वप्नांचे अवशेष पाहिल्यासारखे ! सुंदर स्वप्नं पाहणं फार छान असतं. पण त्याचे अवशेष पाहणं ? एकादी भग्न मूर्ति पाहिल्यासारखं ! शिल्प कोसळल्यासारखं? कुठल्याहि शिल्पकाराला हे कधी आवडेल का ?

ती विस्कळीत होते. कुठलाहि धागा नीटसा हाती लागत नाही. तिची दृष्टी अंतर्मुख होऊ लागते. तो समोर असून नसल्यासारखा ! दृष्टी असून मंदावलेली, आंधळी झालेली ! मोतीबिंदू झालेल्या डोळ्यांसारखी ! हा तोच की त्याची नुसती धूसर छायाच ? की त्याचं भूत ? मानगुटीवर बसल्यासारखं ?

"एऽ मी जातो ग !" तो निघून जातो.

. . . तो खरोखरच आला होता का? की नुसता भासच ? पण नाही. . त्याच्या पायातील खाड्खाड् बूट वाजलेले दाराच्या दिशेनं ऐकू आले. नक्कीच तो येऊन गेला होता. पण आपण कसे इतके संभ्रमित झालो ? त्याला बैसहि म्हटलं नाही ? चहा, कॉफी निदान सरबतहि घेण्याचा आग्रह केला नाही ? साधं विचारलंहि नाही ? —औपचारिकपणानं ?

—तो काहीतरी बोलला. आपल्या लेखनासंबंधी टीकात्मक असेच काहीतरी तो बोलला. ती टीका, निंदा आपल्याला आवडली नाही, माणूस भलताच स्तुतीप्रिय असतो हे खरंच ! त्याच्या टीकेचं ओझं पेलण्याचं सामर्थ्य आपल्यात नव्हतं.

...नव्हतं ? सामर्थ्य असेल अन् नसेलहि ! थोडंसं साहित्य. बरंचसं जीवन. की . . . . की बरंचसं साहित्य नि थोडंसं जीवन ? कोणतं श्रेष्ठ ? जीवन श्रेष्ठ कीं साहित्य श्रेष्ठ ? – मग केवळ साहित्यालाच सर्वस्व वाहिलेला प्रतिभावंत साहित्यिक दारोदार भटकताना कां पहावा लागला असता ? छे छे, थोडंसं साहित्य नि बरंचसं जीवन असावं. कुणास ठाऊक !

इतके विचित्र जीवनानुभव, की त्याला साहित्य कशाशी खातात, हेहि माहीत नसावं. एक विचित्र, सुन्न अवस्था तिला वेढून टाकते.

बाहेर आता ढग गडगडू लागतात. वीजा चमकून उठतात. झोंबरा वारा अंगाचे जणु चावे घेऊ लागतो. उठून खिडकी बंद करावीशी वाटते. पण ती जागची उठत नाही. अधिकच सुन्न, बधीर होऊन बसू लागते. जांभळा अंधःकार धीट पावलानी तिच्या अवतीभवती आता वागडत असतो. आणि ते काळं जांभळं मौनहि बोलकं होऊन थैमान घालू लागतं.

पावसाच्या ज़ोरदार सरी अखंड कोसळत असतात. आभाळ खाली वाकलेलं असतं. धरित्री उचंबळत असते. हा मातीचा वास. . . हा वास. . . . हवाहवासा वाटणारा ! गात्रांगात्रातून चैतन्य ओतणारा. . . मातीतून स्वप्नं फुलविणारा!

मघाशी स्वप्नांची माती करून गेलेला तो ! आणि आता मातीतून स्वप्नं फुलविणारी ही धरित्री ? सगळेच प्रश्न मनात एक अनोखा गुंता निर्माण करतात. पण धाग्याचं ते मूळ टोक तिला सापडतच नाही. ती जड पावलांनी अन् त्याहूनहि जड मनानं दिवा लावण्यासाठी उठते. बटण दाबून स्विच् ऑन करते. पण ढगाळ हवेमुळे करंट फेल झालेला असतो.

ती अंधारातच चांचपडत काडीपेटी शोधायचा एक दुबळा प्रयत्न करते. आणि प्रयत्नांना यश येणारसं दिसतं. टेबलावरील पुस्तकांच्या ढिगाऱ्यात चुकून एक पेटी हाती लागते. उघडते तर मोजून दोनच काड्या ! एक काडी ओढून आधी कंदील शोधावा लागतो. दुसऱ्या काडीनं हाताचा आडोसा धरून कंदील पेटविणं भाग पडतं.

त्यातील मिणमिणती वात हळूहळू प्रकाश ओकू लागते. पण वात पेटविताना काडी टोंकापर्यंत जळत राहते. आणि बोटांना लागलेला चटका जाणवू लागतो. 'आधी लागतो चटका. . .मग मिळते भाकर अरे, संसार संसार. . . '! अरे वाऽ 'आधी लागतो चटका . . .मग मिळतो प्रकाश. . . अरे आकाश आकाश. . .'

आकाशाला गवसणी घालणाऱ्या आपल्या या कल्पना ! पण जीवनाचा






चटका देणाऱ्या जळजळत्या ठिणगी-शिवाय प्रकाश मिळत नाही. आकाश उजळत नाही.

विचारांचा कल्लोळ उठतो. कथा आणि काव्य फुगड्या घालून फिरता फिरता पुन्हा आठवणींचं मोहोळ उठ-वितात.

मधाशी तो अशीच काही टीका करून गेला? म्हणाला, तुझ्या कथा फुलत नाहीत; त्या काव्यात्म बनत नाहीत. कथा कधी काव्यात्म बनते? नि कविता कथात्म बनते? म्हणजे. . म्हणजे कथा-कवितेचे हे परस्पर संबंध. . . ती एकदम बिचकते.

अंधारात मिणमिणत्या कंदिलाच्या प्रकाशाचं नारिंगी पार्टीशन मशाल पेटवून उभ्या असलेल्या सैतानासारखं भासू लागतं. तिला गपकन् डोळे मिटावेसे वाटतात. पण पुन्हा त्या काळोखाचीच भीति वाटू लागते. एक फसवा विरंगुळा म्हणून टेबलावर पडलेलं कुठलंसं मासिक ती उचलते. पानं उलगडली जातात.

कुठल्याशा मधल्याच पानावर दोन कविता ठळकपणे दिसू लागतात. ती कवीचं नांव वाचते. आणि तिला जबरदस्त धक्का बसतो. ती कविता त्याची असते.

त्यानं लिहिलेलं असतं,

'. . . . अशीच तू, अशीच हवी
फुलताना गंध उरी
मोहरू दे पारिजात
थेंब थेंब गालांवरी,
. . तू अशीच मज हवीस. . .

—पुढच्या ओळी तिला वाचवत नाहीत.

उभं मन घुसळून निघतं, कुठंतरी तडा गेलेला असतो. 'अशीच तू. . . अशीच हवी. . . तू अशीच मज हवीस . .' म्हणजे? म्हणजे एकाच कल्पनेभोवती फुलवलेलं ते कथात्म काव्य ते हेच काय? उरी गंध ल्यायलेलं, पाकळी पाकळी मोहर-लेलं, थेंब थेंब फुललेलं. . .आंसू ढाळ-लेलं. . . गालांवरून ओघळलेलं. . . .

हा जिवंत मोहोर फुलत जावा, अथांग बहरत जावा, अखंड वाहत जावा; कुठंच... कधीच करपू नये, ओसरू नये . . . !

शेवटचा आंचका देताना प्रज्वलित होणाऱ्या निचेष्ट देहासारखी कंदिलाची वात भडकू लागली. तिच्या मनासारखीच! तिनं कंदील हलवून पाहिला. त्यातलं रॉकेल संपलं होतं. तिनं झटकन् रॉकेल भरलं.

आता सरींवर सरी ओघळत होत्या. आणि तिची माती सुगंधित होत होती. भिजत होती. बीज अंकुरत होतं. खाली झेपावणारं मीलनोत्सुक ढगाळ आकाश. . . आणि कणाकणातून जिवंत स्वप्नं फुलवि-णारी ती गंधित माती !

तिला कळत होतं. नि कळत नव्हतं. ती असून नसल्यासारखी झाली होती. तिची ती राहिली नव्हती. एक अनामिक चैतन्यमय प्रेरणा सर्वांग चेतवून विजेच्या वेगानं सळाळत चालली होती. आणि त्या प्रकाशात क्षीण वात जाणवत नव्हती. धूसर छाया जाणवत नव्हत्या, कीं भोव-तालचा काळाकुट्ट अंधार जाणवत नव्हता. काही काहीच जाणवेनासं झालं होतं.

—तिला फक्त जाणवत होतं की, ती भराभर भराभर लिहित होती. पानां-मागून पानं !

. . . मूर्ति घडत होती. मातीचे असंख्य सुगंधी कण गात होते. . .अशीच तू अशीच हवी. .

ती तशीच हवी होती. तशीच मिळत होती. अगदी हवी तशी ! आणि पाठीमागे उभा राहून शिल्पकार हंसत होता. कौतुक-भरल्या नजरेनं हंसत होता.

• • •





अनुक्रमणिका








—प्रभाकर अत्रे



# "बेताल मी बेधुंद मी!"

**['दीपावली'च्या दिवाळी अंकातून (१९६६) सुरू झालेली ही "आत्मचरित्र-परिचय"माला या अंकी समाप्त होत आहे. एरॉल फ्लिन ह्या एके काळच्या "मॅटिनी आयडॉल"चे आत्मचरित्र (माय् विकेड विकेड् वेज) मुळातूनच खरं तर वाचण्यासारखे आहे. ते चरित्र अनेक अर्थांनी वैशिष्टयपूर्ण व रोमांचक आहे. ते खूप मोठेही आहे. त्याचा अनुवाद सादर करण्याचा येथे इरादा नव्हता. काही प्रसंगांची झलक येथे सादर केली आहे. मूळ पुस्तक वाचण्याची प्रेरणा रसिक वाचकांना व्हावी ह्या हेतूने सादर केली आहे.]**

**—संपादक**

## रेप! स्टॅच्युटरी रेप!!

**१९४२** च्या अखेरची गोष्ट! मुल्होलॅण्डच्या अभ्यासिकेत एरॉल वाचीत बसला होता. तेवढयात त्याचा सेक्रेटरी **अलेक्झांडर** थरथर कापत त्याच्याकडे आला आणि म्हणाला "दाराशी पोलिस शिपाई आले आहेत. त्यांच्या हातात वॉरंटस् आहेत."

ते आत येतात आणि एरॉलला म्हणतात की, तुमच्या विरुद्ध आमच्याकडे आरोपपत्र आले आहे. आम्हाला तुमची जबानी हवी आहे.

"कसला आरोप? कसली जबानी?"

"स्टॅच्युटरी रेप."

एरॉलचा चेहरा एकदम पडला. रेप आणि स्टॅच्युटरी रेप ह्यातला त्याला फरक कळेना. "कुणाबद्दल हे तुम्ही म्हणता आहात?"

"मिस बेटी हॅन्सन!"

एरॉलला ह्यातले काहीही कळेना. ज्युव्हेनिल हॉलला तो गेला. ती मुलगी कुठे पाहिल्याचेही त्याला आठवेना. लॉस एंजेलिस न्यायालयात बेटी हॅन्सनची केस अजिबात टिकली नाही. एरॉलने सुटकेचा निःश्वास टाकला. तेवढयात दुसरी स्त्री तोच आरोप करीत पुढे आली. तिचे नाव **पेगी सॅटरली!** तिला त्यांनी एका रात्री दोनच्या सुमारास नाइट क्लबमधून पकडून आणली. व येनकेन प्रकारेण तिला त्यांनी एरॉलविरुद्ध तक्रार नोंदविण्यास तयार केले. **सिरोको** ह्या एरॉलच्या बोटीवर त्याने ह्या स्त्रीवर सक्तीने बलात्कार करण्याचा प्रयत्न केला असा आरोप होता. एक वर्षापूर्वी हा प्रयत्न केला होता अशी तक्रार होती. ही केस खूप गाजली. कोर्ट तुडुंब भरत असे. एरॉलला लग्नाची आवाहने येत, मुलाखतीच्या तारखा कळविल्या जात, त्याच्या घराची दारे ठोठावली जात होती. आणि त्याच्यावर एकीकडे बलात्काराचा खटला चालला होता.

न्यायाधीशाने एरॉलला न्याय दिला. तो निर्दोषी म्हणून सुटला.

पण ह्या साऱ्या मागे काही राजकारण होते. त्याचे धागे फार मोठ्या माणसांपर्यंत होते. एरॉलला एका रात्री फोन आला. तो सूचक होता.

ह्या खटल्याने एरॉलसारखा धाडशी पुरुषही खचला.

## स्त्रियश्चरित्रम्......

खटला पुन्हा उभा राहिला. खूप रंगला. पाच महिने चालला. त्यासाठी एरॉलला भरपूर मनस्ताप, भरपूर पैसा खर्च करावा लागला. त्या खटल्याने वृत्तपत्रांचे रकानेच्या रकाने भरून येत होते. हॉलिवुडची नीतिमत्ता वगैरे विषय चर्चिले जात होते. त्या साऱ्या दिव्यातून तो परत सुटला. पण त्या काळात त्याच्या आयुष्यात जाणीवपूर्वक एक स्त्री आली.





अनुक्रमणिका

तिचे नाव **नोरा एडिंगटन** ! ह्या खटल्यां-मुळे एरॉल इतका हादरला होता की, नोराशी संबंध येताच त्याने तिचे वय काय यासंबंधीची प्रथम चौकशी केली. तो सर्वत्र टिंगल-टवाळीचा विषय होईल की, काय अशी त्याला भीति वाटत होती. पण त्या खटल्याने लोकांनी विनोदनच अधिक करून घेतले. त्याचे बॉक्स ऑफिस अपीलच वाढले. आणि एक दोन चित्र-पटांच्या निर्मितीनंतर हॉलिवुडमध्ये त्याने पुन्हा स्वतःचा जम बसविला.

## "अनुभव"सिद्ध मत

खटल्यानंतरच काही दिवसांनी एरॉलने **नोरा एडिंगटन**शी लग्न केले. तिच्या-पासून त्याला एक मुलगी झाली. नोराला त्याने हॉलिवुडमध्ये घर घेऊन दिले. व तो स्वतः मुलोलेंण्डमधील घरी रहात होता. "ह्याच पद्धतीने माझे कुणाही स्त्रीशी लग्न होऊ शकते. तो एकच मार्ग आहे" असं तो म्हणतो. "स्वतंत्र घर, स्वतंत्र जीवने, स्वतंत्र साथ सोबत" हेच आणि असेच!!"

त्याचे जीवन पुढे जात होते. चित्रपटात भरपूर कामे करावी लागत होती. साऱ्याच कथा चांगल्या असत असे नाही. पण कामे करणे भाग होते. खर्च वाढला होता. लिलीचा मासिक हप्ता, नोराचा संसार. मुलाचा व मुलीचा खर्च. म्हणजे एकूण तीन घरांचा खर्च—

आठवड्याच्या शेवटी कधी कधी नोरा मुलोलेंण्डला जात असे. नोराच्या सावत्र आईलाही एरॉलने कुटुंबात समाविष्ट करून घेतले. मार्ग एडिंगटन सेक्रेटरी म्हणून काम करीत असे. पण दोन पत्नी आणि अनेक स्त्रियांशी प्रेम-प्रकरणे करूनही एरॉलच्या मनात मात्र अनुभवाने स्त्रीविषयी एक वेगळीच भीति व अढी उत्पन्न होऊ लागली होती. एकेठिकाणी तो म्हणतो "**स्त्रियांच्या बरोबर वर्षे काढून मी अशा निर्णयाप्रत पोहचलो होतो की, त्यांच्याशी जीवन कंठ णेही कठिण गोष्ट आहे.** आईकडून मला कुठलेही सुख-समाधान नाही. लिलीने तर माझे सारे जीवनच जणु उध्वस्त करून टाकले आहे. दोन मुलींनी राजकारण्यांच्या हातातले बाहुले बनून माझे आयुष्य झोडपून काढण्याचा प्रयत्न केला. **ज्या स्त्रियांची मी आयुष्यात तोंडेही पाहिली नाहीत अशा स्त्रिया मुले घेऊन समोर येतात नि म्हणतात मी त्यांच्या मुलांचा बाप आहे. स्त्रीविषयीच्या माझ्या मनातल्या साऱ्या नाजुक व कोमल कल्पना आता वितळून जाऊ लागल्या आहेत.**

मित्रहो, तुम्हाला आश्चर्य वाटेल. ह्या माझ्या भावनेपायी मी महिने महिने व्रतस्थ एकाकीपणे काढली आहेत. "आयुष्यातला प्रत्येक दिवस स्त्रिया आपल्यावर स्वामित्व गाजवताहेत ही कल्पना मला यत्किंचित्‌ही सहन होऊ शकत नाही."

मी प्रयोग केला ह्याबाबतीत. माझी खात्री पटली.

## तत्वज्ञान

एरॉलने जे स्त्रीविषयक अनुभव घेतले, त्यातून त्याने जी अंतिमोत्तरे शोधून काढली आहेत, ती तत्व व भाषा दृष्टयाही मला गंमतीची वाटली. ती त्याच्याच शब्दात देणे मला आवडेल. तो म्हणतो—

You can read all the Books, articles, stories, that indicate Women want and need attention"; that this is one of the main things they expect and need from man. Nuts. If there is one thing they like better than personal attention I'd say it was this; the man who for a woman fits the bill is the one who pays the bill.

I am just saying that in the war between the sexes dollar Bills change hands.

Wives want houses. They call it love but it spells h-o-u-s-e!!

In the theatre the play is the thing—in real life the thing is play.

## दरिद्री "कुबेर"

माझ्या आयुष्याने माझी क्रूर फसवणूक केली आहे. हीच माझी खरीखुरी खंत आहे. मी जे व्हायला निघालो होतो त्यापेक्षा फार वेगळा असाच मी घडलो गेलो आहे. आज माझे नांव शरीर आणि शारीरिक संबंधांच्या बाबतीशी निगडित झाले आहे. मी जणु पुरुषातला मे वेस्ट आहे असेच म्हटले जाते. "एरॉल लेस्ली-थॉम्सन फ्लिन्," एका मान्यवर प्राणि-शास्त्रज्ञाचा मुलगा, डार्विनच्या सिद्धांतांचा विद्यार्थी, संस्कृतीचा प्रेमिक – यापैकी काहीही होऊ शकलो नाही, त्याऐवजी काही फाजील विनोद, अश्लील कथा यांचाच जणु मी नायक झालो आहे.

लोकांसाठी काहीतरी करावे, मानव समाजासाठी काहीतरी करावे अशी माझी मनोमन इच्छा होती. न्यु गिनीमध्ये असताना तरुण वयामध्ये डार्विन आणि हक्सले हे माझे देव होते. ग्रेट ब्रिटन्स हे माझे प्रतिक होते. आणि नेल्सन हा माझा नायक होता.

माझ्याजवळ मोठे घर आहे. बोटी आहेत, बँक अकाऊंट आहे, पत्नी, मुले सारं काही आहे. पण हे सारं उथळ आहे. कारण माझा स्वाभिमान, स्वत्व मी गमावून बसलो आहे.

मला सवयच झाली. स्टुडियोची सवय. पैशांची सवय. गमतीसाठी वृत्त-पत्रांनी माझा वापर करावा ही सवय. माझ्या रंगाने जग रंगविण्यासाठी लोकांच्या हाती दिलेल्या एका खडूसारखे जीवन जगण्याची संवय. जग अशा तऱ्हेने जेव्हा वागवते तेव्हा माणूस म्हणून आपण जगतो आहोत ह्याची जाणीवच नाहीशी होते.







## कलावंताची वेदना

अभिनयाच्या मध्ययुगीन प्रतिगामी कल्पनांना मी भीत होतो. ज्यात मला खरा अभिनय करायला मिळेल अशी चित्रे निघावीत अशी माझी आशा होती. काही मोठे करून दाखविण्याची माझी जिद्द होती. अशी संधी मिळाली असती तर मी कशासाठी उभा राहिलो आणि काय करू शकतो ते मला दाखवता आले असते. पण संधी आलीच नाही. फक्त कार्यक्रमपत्रिका पुढे असे. त्यात दिवस भरले जात होते. निर्मात्याकडून कथा येत होत्या. चित्रित होत होत्या. कलावंताची इच्छा, जिद्द ह्यांचा जणु संबंधच नव्हता.

भोवती जे घडत होते त्यातून माझी जाणीवच मुळी नष्टप्राय होत होती. जाणीवच मेली तर नट अभिनय तो काय करणार ?

लॉस एंजेलिसच्या त्या कोर्टाच्या खोलीत जणु मी नागवला गेलो आहे ही जाणीव मला भयानकपणे छळीत होती.

लेखक म्हणूनही माझे स्वप्न पार विरले होते. मी नट व्हायला गेलो. कीर्तिवन्त व्हायला गेलो, खूप पैसा मिळवायला गेलो. आणि त्यासाठी लेखक होण्याची उत्कट ऊर्मि मी बाजूला ठेवली. आता तेथेही माझा पराभव झाला होता.

मी पालक होतो. पण माझ्याच मुलांना मी फारसा ओळखत नव्हतो. उपयोगीही पडत नव्हतो. माझ्या दोन पत्नी होत्या. पण त्यांच्याबाबतही मी अपेश घेतले होते.

मी वैयक्तिकदृष्ट्या अतिशय विषण्ण अशा मनःस्थितीत सध्या वावरतो आहे हे फारच थोड्यांना ठाऊक असेल.

## कपाळावर पिस्तुल रोखले

ही स्वगते एरॉलच्या मनःस्थितीची कल्पना देतील. त्याच मनःस्थितीत एका रात्री जाऊन त्याने पिस्तुल काढून कपाळावर लावलेही होते——

पण ————

पुन्हा दुसऱ्या रात्रीही तेच केले. पण चित्रपटात सर्रास बंदुक, तलवार, पिस्तुले वापरणाऱ्या एरॉलची घरी मात्र पिस्तुल वापरण्याची हिंमत झाली नाही.

## हरवले ते गवसले का ?

एरॉलला सायंटिस्ट व्हायचे होते. खलाशी व्हायचे होते. पाण्याशी त्याचे जणु रक्ताचे नाते होते. त्याची लहानपणापासूनच ती कांक्षा होती. चित्रपटातून वेळात वेळ काढून तो सागर माथ्यावर नाचत नाचत नौकाविहार करीतच होता. महायुद्ध संपले. "झाका" नावाची एक मोठी नौका रंगरंगोटी करून विक्रीला निघाली. एरॉलने ती विकत घेतली. त्यावर आवश्यक तेवढे खलाशी नेमले आणि नोराला आणि वडिलांना घेऊन एरॉल पर्यटनाला निघाला. पण नोरा गरोदर असल्याने व वडिलांना प्रवास न मानवल्याने ते दोघे गळाले. एरॉल व त्याचे खलाशी पनामा कालव्यातून पुढे निघाले. व्हेनुजुएलामध्ये काही दिवस राहून ते पुढे निघाले. पण हवेने एकदम वाईट वळण घेतले. वादळाची चिन्हे दिसत होती. साधने अपुरी, अन्न अपुरे पडत होते. त्या आपत्तीला तोंड देत अखेर त्यांना एक दुरून बंदर दिसले. खलाशी आनंदाने नाचू लागले. त्यांनी बोट तिकडे वळवली. आपण नेमके कुठे आलो ह्याचा त्यांना पत्ता नव्हता. बोट धक्क्याला लागली. एरॉल दिसताच साऱ्यांनी त्याला ओळखले. "अरे, हा तर एरॉल फ्लिन्" सारे ओरडले. वृत्तपत्रांनी खूप प्रसिद्धि दिली. त्याच्या ह्या भयानक प्रवासाच्या मुलाखती प्रसिद्ध झाल्या. बोट दुरुस्त केली गेली. "जो ब्लॅकवेल" त्याला आपल्या घरी घेऊन गेला. ते स्थान बेटाच्या पलिकडे होते. तेथे गेल्यावर 'स्वर्ग' म्हणतात तो हाच तर नव्हे ? असे त्याला वाटले. एरॉल खूप आनंदला. श्रमपरिहार झाल्यासारखे वाटले. त्याची पत्नी "ब्लॅंची" आजारी होती. तिने भेट टाळली. पण प्रत्यक्ष मात्र दोघे भेटले तेव्हा आपण युगायुगांचे मित्र आहोत अशी जाणीव दोघांना झाली. एरॉलला हवे असलेले बेट म्हणजे जमेका हेच होय असे वाटून गेले. प्रवास सार्थकी लागल्याचा भास त्याला झाला.

## काही नको, घटस्फोट हवा

१९४९ मध्ये नोरा आणि एरॉलने घटस्फोट घेतला. कारण नोराने एक जोडीदार शोधला होता. त्याला बरीच मुले होती. पण तरीही त्याचीही मुले नोरा सांभाळायला तयार होती. योग असा की, तिने हे सुचविले त्याच वेळी नेमका एरॉलला आपल्या आयुष्यातला मूर्खपणा कळला होता. तो दोन्ही मुलांना घेऊन मुलोलॅंडला रहायला ये म्हणून नोराला सुचविणार होता. पण घडले हे असे. एरॉलने तिला शुभ चिंतिले. "बोल काय करू तुझ्यासाठी ?"

तिला भावनावेग आवरेना. ती म्हणाली "तू माझ्यासाठी जे केले आहेस त्यापेक्षा अधिक तू माझ्यासाठी काही करू शकत नाहीस. सामान्य दशेतून तू मला काही व्यक्तित्व दिले आहेस. तू उदार आहेस. मला घटस्फोट हवा आहे. मी तुझ्याकडून एक पैही घेणार नाही. मी तुझ्या आयुष्यातून निघून जात आहे. मुले तुझ्याकडे राहू देत. मीही त्यांना भेटत जाईन."

२३ ऑक्टोबर १९५० ला **पॅट्रिस वेमोर** ह्या स्त्रीशी त्याचे लग्न झाले. लग्नाची केक कापून झाली. आणि एरॉलच्या अटकेचे वॉरंट घेऊन एक माणूस तेथे आला. १७ वर्षाच्या एका मुलीशी अवैध संभोगाबद्दल ती अटक होती. झाका बोटीवर "वर्षापूर्वी" हे घडले असा त्याच्यावर आरोप होता. "ह्या मुलींना आपल्यावर बलात्कार झाला हे कळायला वर्ष वर्ष लागतात ? काय चावटपणा आहे हा, आतामात्र हद्द झाली" एरॉल म्हणाला. त्याचा चेहरा पाहून पॅट घाबरली. तिने कारण विचारले. "माझा विश्वास बसत नाही असं म्हणत तिने एरॉलचे चुंबन घेतले. **पुरुषाला अशाच प्रकारच्या धीराची गरज असते.**" अस एरॉल मनोमन म्हणाला.

लग्नाच्या दिवशी बलात्काराचा आरोप आणि दुसऱ्या दिवशी तोफांची सलामी असा अपूर्व योग एरॉलच्या आयुष्यात आला. ती दोघे **झाका** बोटीवर गेली. भोवती नौका जमल्या. त्यांचे अभिनंदन केले. दुसऱ्या दिवशी बोटीवरून उडी मारताना एरॉलला अपघात झाला. तो कंबरेवर आदळला.

काही महिने गेले. आपण आता सावधगिरीच्या वयाला येऊन पोहोचलो आहोत अशी एक वेगळीच जाणीव एरॉलला त्या प्रसंगी झाली. ●●●



—पंढरीनाथ रेगे

**मर्तिकाचे दहन करून हळहळत परतणाऱ्या त्यांच्या आप्तेष्टांसारखे साऱ्यांचे चेहरे झाले होते.... गाढव गेले नि ब्रम्हचर्यही.... अशी त्यांची स्थिती झाली होती....**

**मुंबईच्या** गोरेगांव उपनगराच्या पूर्व भागात ब्राह्मणवाडी नामक एक लहानशी वाडी आहे. रहदारीच्या मुख्य रस्त्यापासून थोडी आडबाजूला. पिछाडीच्या रानझाडीच्या थोडी अलीकडे. वड, पिंपळ, चिंच, आंबा, चिक्कू नि माडाच्या पंचवीसतीस लहान मोठ्या झाडांच्या मध्ये दहाबारा बैठी कौलारू घरे विखुरलेली. बहुतेक वस्ती पांढरपेशांची. पण रहिवाशी पांढरपेशे असले तरी नुस्ते भातखाऊ, नेभळट नव्हते काही! काही पुरुषमंडळी पूर्वाश्रमीची का होईना, पण तालीमबाज नि लाठीकाठी चालविण्याचे शिक्षण घेतलेली म्हणून अर्थातच हिंमतबाज होती. आणि म्हणून, वाडी लहान पण खमकी असल्याचा मोठा अभिमान या वाडीच्या रहिवाशांना वाटायचा! आपल्या वाडीकडे वाकड्या नजरेने पाहण्याचे धाडस कोणी कधी करणार नाही, अशी त्यांची पक्की खात्री होती.

त्यांचा हा आत्मविश्वास सार्थ वाटायला लावणाऱ्या घटना अलीकडे त्या वाडीच्या परिसरात घडू लागल्या होत्या. म्हणजे असे की, आसपासच्या भागात वारंवार लहानमोठ्या चोऱ्या-घरफोड्या होऊ लागल्या होत्या. पण ब्राह्मणवाडीच्या वाटेला वळायची कुणा चोराची हिंमत झाली नव्हती. जवळपास कुठे चोरी झाली की, त्याबद्दल रात्री भोजनोत्तर, कुणाच्या तरी अंगणात शिळोप्याची खमंग चर्चा व्हायची. त्या संदर्भात एकेकजण आपला व आपल्या वाडीचा मारे अभिमान मिरवायचे.

त्या दिवशी रात्री जेवणे आटोपल्यावर आपट्यांच्या अंगणात गोगटे, देशपांडे, गोडबोले, कुळकर्णी, लोंढे, राईलकर आदी मंडळींच्या अशाच गप्पा चालल्या होत्या. आधल्या रात्रीच पलीकडल्या वाडीत एक चोरी झाली होती, त्याची विशेष माहिती, त्या वाडीत राहणाऱ्या आपट्यांच्या कचेरीतील सहकाऱ्याकडून त्यांना कळली होती. आणि त्याचे रसभरीत वर्णन ते, पानतंबाखूसहवर्तमान चविष्टपणे रंगून करीत होते.

झाले होते काय—की......घरची सर्व मंडळी रात्री सिनेमाला गेलेली पाहून एका चोराने त्या घरावर धाड घातली होती. छपराची काही कौले काढून तो घरात शिरला होता व आतली मोलाची तेवढी चीजवस्तू घेऊन बेमालूम पळाला होता.

—तर त्या शर्विलकी कारागिरीचे कौतुक आजच्या बैठकीत चालले होते.

"चोर तरी लेकाचे मोठे कसबी बनलेले दिसतात!" कुळकर्णीचे शिफारसपत्र, "काय नव्या नव्या कल्पना लढवतील त्या खऱ्या!"

"पण माझं म्हणणं असं, की—हे लोकच लेकाचे नेभळट—बुळे—बेहिंमत! चोरांना यांचा वचक वाटेल तर ना? नाही तर आपल्या वाडीचं पहा! कुणा चोराची हिंमत होतं का पाहू इकडे वक्रदृष्टी वळवायची?"—गोगटे आपली भरदार छाती उजव्या हाताने थोपटीत ठासून म्हणाले.

"आपल्या वाडीत चोरी करण्याची कुणा चोरट्याची माय व्यालीय् म्हणा! अशी हड्डी नरम होईल की जन्माची याद राहील बेट्याला!" राईलकर आपल्या मिशीला पीळ भरीत फिस्कारले.

"आपल्या वाडीला चांगले वचकून असतील चोर. म्हणून तर इतक्या वर्षात भुरटी चोरीसुद्धा करायला कुणी मायेचा पूत धजला नाही."—गोडबोल्यांनी पुस्ती जोडली.

"या चोरांची अवलाद मऊ तिथंच खणायची. आपला जीव सांभाळूनच चालतात की त्यांचे धंदे. मग येतात कसचे मरायला इथं!"—तपकिरीचा बार नाकपुडीत कोंबीत लोंढे गेंगाण्या स्वरात फुरफुरले.

"नाही तर काय? आपल्या वाडीत यायचं तर चोराला आधी आपला विमाच उतरवून यावं लागेल. होऽऽऽऽ!" स्वतःच्या विनोदावर स्वतःच बदबदून हंसत गोगटे बोलले.

मग इतरानीही गोगट्यांना हंसून साथ दिली, आणि थंडीचा गारवा वाढू लागल्याने त्या हास्यकल्लोळातच मंडळी उठली.

आपापल्या घरी जाऊन निश्चिंतपणे गाढ झोपी गलो.

त्या मंडळीच्या या वल्गना कुणा चोराने आडून ऐकल्या की काय नकळे! पण त्याच रात्री त्यांची कसोटी पाहण्याचा कुणा एका चोराने चंग बांधला खरा!

मध्यरात्र नुकतीच उलटली होती. अमावास्येचा काळोख सगळीकडे दाटला होता. कारण, घरोघर विजेचे दिवे आले होते. तरी वाडीत दिव्याचे खांब नव्हते. थंडीचे दिवस असल्याने हवेत गारठा पडला होता. ब्राह्मणवाडीतील सारी मुले-माणसे शक्य तेवढ्या जाडजूड पांघरुणांच्या उबेत डाराडूर झोपली होती. कुणाकुणाच्या घोरण्याचा कमीअधिक तालस्वर सोडला, तर सारे कसे शांत शांत होते.




इतक्यात एक चोर जपून पावले टाकीत आपटयांच्या घराशी आला. त्याच्या हालचालींवरून तो सराईत असावासे दिसत होते. शेतात उभारतात तसले कापडाचिध्यांचे माणसाच्या आकाराचे बुजगबाहुले त्याने आपल्या डाव्या काखोटीत धरले होते.

आपटयांच्या घरालगतच्या आंब्याच्या झाडाची एक फांदी घराच्या कौलारू छपरावर पसरली होती. बुजगबाहुले जमिनीवर ठेवून, त्याच्या मानगुटीला बांधलेला दोर त्याने आपल्या कमरेला बांधला; आणि तो शिताफीने झाडावर चढला. छप्पराच्या जवळ येताच, कंबरेचा दोर सोडून मागे लोंबकळणारे ते "बाहुले" त्याने वर ओढून घेतले. ते पुन: काखोटीला मारले, आणि आडव्या फांदीवरून तो छप्परावर अलगद उतरला.

मग राजेश्रीने बाहुले बाजूला ठेवून हलक्या हातानी छपरावरची काही कौले काढून बाजूला केली; आणि खिशातल्या धारदार सुरीने बांबूची कडणी कापून बाहुल्याच्या जाडीइतका भोकसा पाडला. नंतर त्याने ते बाहुले भसकन् आत ढकलले, आणि तो विलक्षण चलाखीने सरासर झाडावरून खाली उतरला. लगेच तिथून त्याने पळ काढला, तो थेट आडबाजूच्या गोडबोल्यांच्या घराच्या पाठीमागचा आडोसा गांठला.

त्याच्या अपेक्षेप्रमाणे आपटयांच्या घरातून लगेच 'चोर-चोर' अशा आरोळ्या उठल्या. माणसासारखे काहीतरी धपकन् घरात पडलेले पाहून आकांत करीत आपटे पतिपत्नी, काळोखातच कसेबसे दार उघडून घाबऱ्याघुबऱ्या बाहेर पडली. आपटयांनी प्रसंगावधान राखून दाराला बाहेरून झटकन् कडी लावून घेतली. मग "चोर-चोर!....आमच्या घरात चोर शिरला!" अशी एकच हाकाटी त्या दांपत्याने चालविली.

आरडाओरडा ऐकून सबंध वाडी दचकून उठली. आजुबाजूच्या घरांतून बरीचशी पुरुष मंडळी, झोपाळलेले डोळे चोळीत धावत आली. हाताला लागली ती लाठीकाठी सरसावीत एकेकजण समरांगणावर येऊन ठेपले. गोडबोल्यांबरोबर तर त्यांची उत्साही अर्धांगीपण धावली. गडबडीत घरात कुणीहि नसताना त्यांचे घर सताड उघडे राहिले.

चोराच्या मनाजोगती संधी चालून आली होती. तो हळूच त्यांच्या घरात शिरला, आणि काळोखात हाताला सापडले ते घड्याळ, ट्रॅन्झिस्टर आदी मौलवान चीजवस्तू एका चादरीत गोळा करू लागला.

इकडे आपटयांच्या घराबाहेर एकच गलका उडाला होता. थंडीच्या गारठयात ऐन मध्यरात्री उठून यावे लागल्याने करवादलेला एकेकजण आपटयांवर प्रश्नांची सरबत्ती चालवीत होता—

"अहो पण, झालं तरी काय असं? चोर कुठून नि कसा शिरला?"

"कसा शिरला——कसा शिरला कुणास ठाऊक!"...आपटे चांचरत उत्तरले, "प–पण....धप्कन् घरात कुणीतरी उडी मारल्याचा आवाज झाला. शेजारच्या वाडीत काल रात्री झालं तसं.....छपरातून चोरानं उडी मारलेली दिसते."

"तुम्ही पाहिलात त्याला?"

"काळोखात तसं काय दिसणार?"

"मग तुम्ही पाहिल्याशिवायच घाबरून बाहेर पडलात?"

"घाबरून ?–घाबरून नाही काही. प–पण कुणाला मदतीला बोलवायला नको का? त्याच्याकडे सुराबिरा असायचा! काळोखात काय प्रसंग ओढवेल काय सांगता येतं?" आपटेंचा ओशाळा खुलासा.

"मीच यांना बाहेर ओढून काढलं हो! नाहीतर हे त्याला सरळ भिडायला जात होते!" सौ. आपटयांनी पतिराजांची बाजू सांवरण्याचा प्रयत्न केला.

"तरीपण बाहेर पडताच लगेच दाराला बाहेरून कडी लावून घेतली."–आपटे आपले प्रसंगावधान मिरवीत म्हणाले.

"ते बरं केलंत म्हणा, पण–" गोडबोले बोलले, "आता वेळ न दवडता आत जायला हवं. आपटे, तुम्ही प्रथम पुढं व्हा नि दिवा लावा. आम्ही आहोतच पाठोपाठ."

"अहो, येताना आपण आपलं दार लावून घ्यायला विसरलो की! घरांत कुणीच नाही–" सौ. गोडबोलेंना अचानक आठवण झाली.





अनुक्रमणिका

"अरेच्चा! हो की!" गोडबोले चमकून उद्‌गारले. "तूच पाठोपाठ आलीस माझ्या–उघडं घर सोडून. चल. जा बघू. तिथं आणखी एखादा याचा साथीदार शिरायचा!"

सौ. गोडबोले बिचारी धांवतपळत आपल्या घराचे दार बंद करायला निघून गेली.

इकडे आपटचांना स्वत:च्या घरात मुकाटचाने प्रथम शिरण्या-वांचून गत्यंतरच नव्हते, तरीपण यावेळी धीराला बरोबर वाडीतली लाठीधारी माणसे होती.

आत शिरताच त्यांनी प्रथम दाराजवळचे बटण दाबून दिवा लावला. तो काय—समोरच ते बाहुले पडलेले. लाठचा-काठचा सरसावणारे सारेजण चकितच झाले. सगळचांच्या नजरा लगेच वर–छपराकडे गेल्या, तर छपराला भोकसा पाडलेला.

एकेकाने काठी सरसावीत सारे घर धुंडाळले. पण चोराचा कुठेच पत्ता नव्हता. घरातले सामानसुमान सर्व काही जागच्या जागी जसेच्या तसे होते.

"म्हणजे.....प्रत्यक्ष चोर घरात शिरलाच नाही तर! उगाच घाबरवून सोडण्यासाठी कुणीतरी चेष्टा केलेली दिसतेय्." राईलकर हातातली काठी जमिनीवर आपटीत उद्‌गारले, "तरी वाटलंच! आपल्या वाडीत कुणाच्या घरात शिरायला कुणी चोर धजणं म्हणजे........."

'चोर–चोर!..अहो, तिकडे आमच्या घरात चोर शिरला बघा, कायमाय गाठोडचात भरून घेऊन तो पहा पसार होतोय् विहिरीकडल्या वाटेनं. चला धांवा!"–धांवत पळत आलेल्या सौ. गोडबोले धापा टाकीत किंचाळल्या, त्या मुळी 'चोर–चोर' असे ओरडत घरापासूनच धावत सुटल्या होत्या.

साऱ्या पुरुषमंडळीने आपला मोर्चा आता प्रत्यक्ष चोराकडे वळविला. चोराच्या दिशेने गोडबोले पुढे आणि बाकीचे त्यांच्या मागोमाग असे धावत सुटले. गोडबोल्यांचीच चोरी झाली असल्याने ते तिडकीने सर्वांच्या पुढे धावत होते. शाळा कॉलेजात असताना पळण्याच्या शर्यतीत गोडबोल्यांनी अनेकदा भाग घेतला होता. त्यामुळे त्यांना धावण्याचा, जुना झाला तरी, सराव होता. त्यात आणखी स्वत:ची चोरी झाल्याच्या पोटतिडकीची यावेळी भर पडलेली. त्यामुळे काळोख मिट्ट होता तरीसुद्धा पळत्या पाव-लांच्या आवाजाचा मागोवा घेत, चोराचा त्यांनी शिकस्तीने पाठलाग चालवला.

वाडीच्या कडेला एक बिनकठडचाची भुईसपाट विहीर होती. चोर त्या विहिरीकडे पोचेतोवर गोडबोल्यांच्यात व त्याच्यात फारच थोडे अंतर उरले. चोर मधूनच पाठीमागे वळून पाठ-लागाचा अंदाज घेतच होता. आता पुढचा माणूस आपल्याला लौक-रच गांठील हे त्याला कळून चुकले. तोच त्याला विहीर दिसली. त्याबरोबर तिच्या कांठाशी असलेल्या कपडे धुण्याच्या दगडाची त्याला एकदम आठवण झाली. (चोरीसाठी जाताना त्याला त्याची ठेच लागली होती.) तत्काळ त्याने युक्ति लढवण्याचे ठरवले. आणि क्षणाचाही वेळ न दवडता, गाठोडे खाली ठेवून त्याने तो दगड उचलला आणि धबाड्कन् त्या विहिरीत फेकून दिला. आणि विहिरीत दगडाचा आवाज घुमेपर्यंत तो चोर गाठोडचासह तीरासारखा पळत, पसार सुद्धा झाला.

मिट्ट काळोखात काही स्पष्ट दिसत नव्हते. त्यामुळे खरे काय झाले ते कुणालाच नीटसे समजले नाही. पण साऱ्यांनी सरधोपट तर्क केला की ज्याअर्थी चोराची पावले. वाजण्याचे थांबले त्याअर्थी, उघडचा भुईसपाट विहिरीची कल्पना नसल्याने तो अनोळखी चोर काळोखात विहिरीत अपघाती पडला असावा. त्याशिवाय एवढा आवाज विहीरीच्या पाण्यात अचानक कसा झाला असता?

गोडबोल्यांसकट सगळेजण विहिरीपाशी येताच थबकून उभे राहिले.

"आता बरा तावडीत सापडला! जातो कुठं?" गोडबोले धापा टाकीत उत्साहाने बोलले. "सारेजण विहिरीभोवती उभे रहा. नाहीतर गुपचूप वर चढून काळोखात कुठल्या तरी बाजूनं हातोहात पळून जायचा!"

सर्वजणांनी विहिरीला घेरा दिला.

"लेकाचा आता हाती सांपडलेच म्हणा; चांगली हड्डी नरम करूया. पोलीसबिलीस मागाहून. विहिरीत पडत ना कदाचित् हातपायसुद्धा मोडला असेल. निदान कुठंतरी लागलंबिगलं असेलच––आपटचांचा अंदाज.

या "थंडीच्या गारठचात गार पाण्यात तो आधी चांगलाच गारठून निघेल. वर आला की मग आहोतच आपण समाचार घ्यायला. हुं!" हातातला दांडका विहिरीच्या दगडी काठावर आदळीत राईलकर हुंकारले.

"आपल्या वाडीत चोरी करायची म्हणजे काय चेष्टा वाटली काय गुलामाला?" देशपांडे दांतओठ खात बोलले.

"मात्र एक—त्याच्याबरोबर त्याच्या हातातलं गोठोडंही







भिजलं असेल!" लोंढेंना आठवण झाली. "त्यातलं सामान भिजून जाईल!"

"ते जाऊ द्या हो! त्याचं काय होईल ते होईल त्याला काय इलाज?" आपटे लोंढेंना डावलीत म्हणाले.

चोर धडपडत वर आल्यावर त्याचे कांडप कसे करायचे या चर्चेत काही मिनिटे अशीच गेली. पण चोर वर येण्याचे लक्षण दिसेना. विहिरीत पाण्याची काही खळबळ वा कसली हालचाल ऐकू येईना. आता गोडबोल्यांना शंका येऊ लागली——.

"अरेच्चा ! विहिरीत तर सामसूम दिसतंय् की ! बुडाला असणं शक्य नाही. तेवढं पाणीच कुठं आहे आत? मग हो?"

"अरे, कुणीतरी विजेरी घेऊन या बघू लगेच. त्याशिवाय नीट काही उलगडा होणार नाही." लोंढेनी सूचना केली.

सारेचजण चोराच्या काळजीत पडले. तेवढ्यात कुणीतरी धावत जाऊन विजेरी घेऊन आला आणि त्याने विहिरीत प्रकाशाचा झोत टाकला. तो काय—

डुचमळलेले पाणी आता संथ झालेले दिसत होते. कुणा माणसाचा पत्ता नव्हता, की गाठोड्याचा. पाणी मात्र गढूळ झालेले होते.

सारे हिंमतबहाद्दर हतबुद्ध होऊन एकमेकांकडे चमकून पाहू लागले. इतक्यात, विहिरीच्या काठावर नेहमी असलेली कपडे धुण्याची दगडी पाथर जाग्यावर नसल्याचे विजेरीच्या उजेडात कुणाच्या तरी लक्षात आले. विजेरीवाला त्या जागी प्रकाशाचा झोत टाकीत म्हणाला—

"अरे, आपला कपडे धुण्याचा दगड दिसत नाही इथं. आत्ताच कुणीतरी उखडलेला दिसतोय्. दगडाखालची उस्कटलेली माती ताजी ओलसर दिसतेय्."

"आं ?–अरे खरंच की !" वाकून पहात केळकर उद्गारले. "हाच दगड विहिरीत फेकून चोरानं चकवलेलं दिसतं आपल्याला. बघा कशी हुलकावणी देऊन गुंगारा दिला तो. आता पलीकडल्या रानझाडीत केव्हाच पसार झाला असेल बदमाश!"

"अरे कर्मा! म्हणजे आमचं गाठोडं गेलंच म्हणायचं आता !" कपाळावर हात मारून गोडबोले हताशपणे सुस्कारले.

आपली चांगलीच जिरली या बोचक जाणिवेने किंचित् काळ एकजात सर्वांची वाचाच बसल्यासारखी झाली. कारण, तो चोर लेकाचा गोडबोल्यांच्या गाठोड्याबरोबर त्या सर्वांच्या म्हणजेच हिंमतवान ब्राह्मणवाडीच्या अब्रूची लक्तरेही घेऊन पसार झाला होता!

स्मशानात मर्तिकाचे दहन करून परतणाऱ्या आप्तमंडळीप्रमाणे खिन्न मुद्रेने, तोंडावाटे अवाक्षर न काढता सारेजण हळहळू माघारी परतले. 'गाढव गेले आणि ब्रह्मचर्यंही गेले' अशी त्यांची स्थिती झाली होती.

बाकीच्यांची अब्रूच काय ती गेली होती. पण गोडबोल्यांच्या घरचे डबोलेही भरीला गेलेले. त्यामुळे प्रत्यक्ष काय काय चोरीस गेले त्याची तपासणी करण्यासाठी गोडबोल्यांनी मात्र जरा लगबगीनेच आपले घर गांठले.

हळूहळू करता बाकीची मंडळी प्रथमच लागलेल्या आपटयांच्या घरापाशी आली, तसे आपटे मुकाटयाने आपल्या घराकडे वळले. त्यांच्याच घरापासून चोराने हुलकावणी द्यायला सुरुवात केली होती हे आठवून साऱ्यांनी त्यांच्या घराकडे सहज एकवार नजर टाकली, तर काय–घराच्या अंगणात भिंतीशी ते बुजगबाहुले उभे करून ठेवलेले. काळोखात ते पांढरेशुभ्र बाहुले आपल्याकडे पाहून खवचटपणे हंसत असल्याचा भास त्यांना झाला. आणि, घोषयात्रेहून नामुष्कीने परतणाऱ्या कौरवांप्रमाणे मान खाली घालून ब्राह्मणवाडीचा एकेक तालीमबाज वीर चुपचाप आपापल्या घराकडे वळला.

मस्त थंडी असूनही त्या रात्री मग कुणालाच धड झोप लागली नाही.

● ● ●

प्रतिक्षेनंच पूर्ति होते राणी....विरहातच
मीलनाचं बीज उमलतं.. ते गोड लाघवी
पत्र....तिने त्याचे तुकडे तुकडे
करून भिरकावले....त्यात सुद्धा विखुरलेल्या
आठवणी दिसत राहिल्या....

—सौ. सुनीता देवधर



# ❀ अश्रूंची ❀ झाली ❀ फुले ❀



"बोल ना!"

"अग. नुसत्या कल्पनेनंच कसं मस्त वाटतंय्, मग खरोखर तिथं गेल्यावर!"

"कसं?"

"अगदी इंग्लीश चित्रपटासारखं."

ती ओथंबल्या नजरेने त्याच्याकडे पहात राहाते.

"बोट हाऊसमध्ये दोघं पहुडलो आहोत. मी तुला जवळ घेतली आहे. रेकॉर्डवर प्रीतीगीत वाजत आहे. ते सूर तुझ्यामाझ्या नजरेत मनात सामावले आहेत. धुंदीच्या छटानी वातावरण भारावलं आहे. आकाशात चंद्र आपले चाळे पहातो आहे आणि आपण—"

"बोल ना रे! थांबलास कां?"

"आणि आपण———

तुला लाज वाटते त्या चंद्राची. तूं पांघरुण ओढून घेतेस आणि मीही तुझ्या पांघरुणात शिरतो.

"इश्य" ती अजुनी त्याच्याकडे पहात राहाते.

"अस्सा आहेस" म्हणत हातातील ब्रश त्याच्या केसात फिरवत.

**लग्नाआधी** दोघांचं फार प्रेम होतं.

तो बँकेत अधिकारी होता आणि ती कुठंतरी वरच्या पोस्टला. पैसा भरपूर मिळत होता. बँकअकाऊंट वाढत होता. दादरला झकास ब्लॉक होता, चार रूमचा आणि लोणावळ्याला बंगला होता. सुटी एन्जॉय करायला मस्त. शनीरवी लोणावळ्याची ट्रीप व्हायची. शिवाय कधी दांडी. कधी किरकोळ रजा.

"काश्मिरला जाऊ या का रे?"

एक दिवस तिने विचारलं

"हं"

"नुसतं हुं काय करतोस?"

"मग?"

दोघं हसतात. ब्रशच्या रंगाने त्याचे केस पांढरे होतात. ती तो रंग पुसटून टाकते.

आणि आता त्याचे केस खरोखरच पांढरे झाले आहेत आणि तिच्या भांगात एक पांढरी रेषा उमटली आहे. वयाची ही अंधुक चाहूल तिला जीवघेणी जाणवत आहे. पण आताही ती स्मृती तिच्या

मनात खुदुखुदु हसते आहे.

"हात् वेडचा, इंग्लिश चित्रपटात असं असतं होय?"

"मग?" तो किलकिल्या डोळ्यानी विचारतो आहे.

"हे सारं हिंदी चित्रपटात."

"मग इंग्लिश चित्रपटात काय असतं सांग ना?"

तो अजूनही तसाच पहात विचारत आहे.

"चल फाजिल कुठला."

"सांगू?"

तोच कृतीने ते सांगतो. तिचे गाल लाल होतात. आताही त्या स्मृतीने. पण क्षणभर. लगेच तिच्या डोळयात पाणी तरारतं. तिला वाटतं ते सारं स्वप्न होतं. आणि आता आहे हे एक सत्य.

शो-केस सुबक वस्तूने भरलं आहे. काश्मिरमधून आणलेला अमसुली टी-सेट समोर बसला आहे. तो काळा टी-सेट पसंत करतो. इश्श्य काळा काय घेतोस? हा अमसुली घेऊ या. बघ कसा मस्त आहे. आणि तो हिरव्या चिंचेसारखा लेमनसेट घेऊ या. आणि काश्मिरसिल्क. ती हिरव्या कैऱ्यांची साडी बघ. अय्या किती सुंदर आहे. घेऊ या का रे?

दोघं भराभर खरेदी करतात. हिरवी चिंच कैरी अमसुलं. आंबट खावंसं वाटतयं कि काय राणीला? तो थट्टा करतो. ती त्याला बिलगते.

"टी-सेट खातात होय?"

अजूनी तो टीसेट लेमनसेट शोकेसमध्ये बसला आहे. गोदरेजमध्ये साडचा हारीनं उभ्या आहेत. ती हिरव्या कैऱ्यांची साडी. शिवाय बंगलोर सिल्क. म्हैसूर सिल्क. काश्मिरहून आणलेल्या डझनभर साडचा. कांजिवरम्. बनारसी शालू. चिकन्साडी. शिवाय मुंबईची महिन्याची खरेदी. त्यात ती हिरव्या कैऱ्यांची साडी हिरमुसली होऊन अगदी खाली दबली आहे. ती स्मृती बेचव झाली आहे. तिला कधीच... कधीच आंबट खावंसं वाटलंच नाही.

दोघाना हौस असते. खूप हिंडावं फिरावसं वाटतं. प्रवास करावासा वाटतो. सगळं हवं तसं असतं. मजा येते.

एकदा दोघं रामेश्वरला जातात. रामेश्वरचं ते भव्य मंदीर. तेथीली तिर्थ. भटजीनी दिलेला प्रसाद. आणि येताना गाडीत भेटलेला तो सहप्रवासी. त्याचे ते गुदगुल्या करणारे शब्द.

"मी रामेश्वरचा प्रसाद घेतला आणि पुढच्या वर्षी मुलगा झाला. तुम्हालाही पुढच्या वर्षी असाच छोकरा——पेढे द्यायला विसरू नका."

पण ते गोड शब्द कटुतेनं वावरले. रामेश्वरचा प्रसाद पावलाच नाही. आणि त्या रम्य स्मृती केवळ स्मृतीच राहिल्या.

मीनाक्षी मंदीराच्या खांबातून निनादणारं ते संगीत जणू मनापार हरवलं आणि त्या स्मतीच्या पटलाआडून एक बेसूर संगीत घुमत राहिलं.

वृंदावनची लखलख कधी जीवनात प्रकाशलीच नाही. तेथील 'गिरीविहार'-मधील आराधना प्रणयाचं चिंतन आणि प्रीतीचं मीलन सगळं केवळ स्मृतीत विलीन झालं. सगळं केवळ एक स्वप्न ठरलं. त्यातून सत्य प्रतिमा उमललीच. नाही.

तरीही अजूनी आशेनं थबकलं होतं आकाश. दिसेल जीवनात प्रकाश. होईल संसाराचा विकास. हा एकच ध्यास रात्रंदिन मनीमानसी पुजत दोघं आसावत होती.

आणि मग मसुरीची सहल निघाली. तेथोल थंडाई शीतल सुखकर वातावरण. तेथली ऊब सगळं कसं अजूनी हवसं वाटतं. मनापुढं साकारतं. आणि त्या उबदार हवेत ब्लँकेट पांघरून घेतलेली साखरझोप. त्या साखरेची रेंगाळती गोडी आणि त्यात मिसळलेलं खारटतुरट डोळ्यातील पाणी. एक दुखरी जाणीव. बोचरं दुःख. अंतराचं व्यथावणं. त्या साखरेचे पेढे झालेच नाहीत. झालेच नाहीत.

उन्हाची रखरख कमी करणारी महाबळेश्वरची ऊब तिथं जाऊनही त्यांच्या जीवनात शिरली नाही. त्यांच्या जीवनाचा ऋतु बदललाच नाही. हवापालट झालीच नाही.

**एक प्रलयकथा–**

**पाण्यात शिकला**
**एक देवमासा**
**मनूला वाटले**
**महापूर जसा.**

**माश्याच्या शिंगाला**
**बांधली होडी**
**अन् ठेवली होडीत**
**कबुतरांची जोडी.**

**कबुतराच्या जोडीने**
**घातले होडीत अंडे**
**मनूला मात्र आठवली**
**लाख लाख ब्रह्मांडे.**

**–ह. शि. खरात**

तिला वाटतं आपल्या मांडीवर गोजिरवाणं बाळ खेळावं. निदान एक तरी. मुलगा मुलगी काहीही चालेल. पण एक हवंच. त्याचीही प्रतिक्षा आसावते. बाबा व्हायची त्याला घाई असते. पण प्रतीक्षा पूर्तीचं समाधान देतच नाही. प्रतीक्षेतच रखडत खुरडत वाटचाल होते दहा वर्षांची आणि मग दोघाना बिचकावते वाढत्या वयाची जीवघेणी जाणीव.

ती अती हळूवार होते. कोमल मनाच्या पाकळ्यांवर व्यथेचे भुंगे टोकारतात. आणि त्या टोचानी पाकळचा घायाळतात. जरासं कुठं बोललं की लगेच तिचे डोळे भरून येतात.

त्या थेंबाथेंबात तिच्या जीवनाच्या आठवणी ठिबकतात बाल्यातील कोवळचा कोंबासारख्या आठवणी. निसटत्या तारुण्यातील पुसटत्या गुलाबी आठवणी आणि आताच ते जखमी मन आणि ठणकणारी वेदना.

एकदा तो फिरतीवर गेलेला असतो. विरहाची हुरहूर तिला सतावते आणि ती पत्रातून प्रीतिगीत आळवते. त्या





अनुक्रमणिका

गीताचे सूर आताही तिच्या कानात घुमतात.

विरह सहन नाही होत राया । प्रतिक्षेने शिणली काया ।।

आणि रायाचे ते गोड गुजन तेही यावेळी तिच्या कानी गुंगावते.

प्रतिक्षेनंच पूर्ती होते राणी. विरहातच मीलनाचं बीज उमलतं. आणि विरहापाठीमागून येणाऱ्या मीलनातून प्रीतीची पूर्ती होते. वंशाचा अंकुर वाढतो.

ते गोड लाघवी पत्र तिने कितीतरी वेळा हृदयाशी घट्ट धरून ठेवलं होतं. आणि डोळे मिटून तृप्त भावाने ती पूर्तीचं सुख घेत होती. पण आता ते एक स्वप्न ठरलं होतं. ते भंगलं होतं. ती उठली. त्या पत्राचे तिने तुकडे तुकडे केले. ते वाऱ्यावर भिरकावले. पण त्या भिरभिरणाऱ्या तुकड्यातसुद्धा तिला सगळ्या विखुरलेल्या आठवणी दिसत राहिल्या.

☆ ☆ ☆

डॉक्टर किती झाले?... एक दोन नाही. सगळे माहीत होते नव्हते तेवढे सगळे. सगळे एकच सांगतात. दोघांमध्ये दोष नाही. मग असं कां व्हावं? कां व्हावं? कशासाठी हा जीवघेणा छळवाद. कशासाठी ही राक्षसी कुतरओढ. क्कित्ती प्रेम होतं माझ्यावर! पण ते सारं आटलं कां? कां आटलं? केवळ एकाच कोमल व्यथेपायी.

आईवडील लहानपणीच सोडून गेले. मावशीने मग वाढवलं. ओढ होत असूनही तिनेच मॅट्रिकपर्यंत शिकवलंन् आणि मग ती शिदोरी भावंडाना पोसायला पुरी पडली. भावंडं वाढली. मोठी झाली. आणि मग हा भेटला.

प्रेमभरल्या नजरेचं ते पहिलं वहिलं दर्शन. शब्दांची फुलबाग फुलवीत घडलेली ती पहिली भेट आणि मग डाव मी जिंकला. ह्यानी कॉलेजचा खर्च केला. भावंडांची जबादारी उचलली. मायेने सगळं केलं. आता जबाबदारी पूर्ण झाली आहे. सगळे आपल्या पायावर उभे आहेत. पैसा पुरेसा आहे. पैसा म्हणजे सुख असेल तर ते भरपूर आहे. शिवाय आता ह्याना आणखी प्रमोशन मिळालं आहे. आणि मी पण लवकरच अधिकारी होणार आहे.

चुलीत गेलं ते सुख घरात चुल नाही. गॅस गिझर. पंखे गोदरेज फ्रीज. शॉवरबाथ. कपडे धुण्याचं यंत्र, रेडीओ ट्रॅन्झीस्टर कॅमेरा सोफासेट इस्त्री धुलाई शिलाई सगळी कामं यंत्रावर. हाताशी घरगडी. मोठ्या दिवाणखान्यात टांगलेला नव्या जोडप्याचा हसरा फोटो. त्या हास्यात एक दुखरी व्यथा आता जाणवते आहे.

शोकेसमध्ये सुबक वस्तूंची भर पडतेच आहे. गडी धूळकचरा झाडतो आहे. खरं तर दिवाणखाना लख्ख आहे. तरी त्या सगळ्या वस्तूंवर एक धूळ साठली आहे. मालीन्य भरून राहिलं आहे.

आताशा वेळेवर घरी येत नाहीत. कधी ऑफिसमध्ये थांबतात. कधी आणखी कुठं मन रमवतात. दुखरा जीव म्हणून मी जरा दुर्लक्ष करते. पण मग हे वाढतच जातं.

रोज रात्री दहा अकरा वाजता घरी येतात. आज मालाडला गेलो होतो. कधी दादरला कधी पार्ल्याला कधी कुठं. रोज नवी कारणं नव्या सबबी. घराची ओढ मावळली आहे. मी समजून घेते.

पण मी बाईमा ूस मला घराची ओढ असणारच. धडपडत घरी यायचं. कुलूप काढायचं. सगळं करायचं. दोघांच तर काम. वेळ जायला साधन नाही म्हणून स्वयंपाकाची बाई मीच काढून टाकली. आणि आता ओढाताण होते आणि कंटाळाही येतो. दोघं एकदम आलो तर वेळ बरा जातो म्हणून गोड शब्दात आर्जवून पाहीलं पण 'ठोंब्या मी बहिरा' ही वृत्ती. आणि वर धुडकावणं चालूच राहीलं.

"कुठं गेला होता?" सरळ प्रश्नाला "वेश्येकडे" यासारखी वाकडी उत्तरं. काही बोलायची सोय नाही.

"सांगितलयं कुणी बोलायला"

"लवकर येत जा ना?"

"मला हवं तेव्हा येईन, नाहीतर येणार नाही"

"रोजरोज कशाला जायचं मालाडला? उशीर होतो मग"

**मी नेहमीच म्हणते, तुम्ही नशीबवान अहात म्हणून ! काठीवरच निभावलं !**
**थोडा वेळापूर्वी बाबांच्या हातात बंदूक होती–**

"तू माझ्यावर आरोप करतेस?"

दिवसेंदिवस अशी कमान चढत चालली. मी बोललेल्या सरळ शब्दांना वाकडा अर्थ येत राहिला. डोळे भरून येणं हे सुद्धा एक ढोंग ठरलं.

मी मनाला समजावत होते. बाहेरून प्रज्वल दिसू दे. आत प्रकाश आहे. बदामाचं कवच टणक असतं पण आतमध्ये गोड वदामगर असतो. कधीतरी टणक कवच फुटेल आणि गोड बदामगर खायला मिळेल.

आणि मग बोलणंच बंद झालं. विचारलेल्या प्रश्नाला 'हो 'नाही' इतकंच उत्तर. अधिक एक शब्द नाही. पानात पडेल ते खायचं आणि पांघरूण घेऊन झोपायचं. कधी मोकळेपणी चूक सापडावी यासाठी बोलणं काढलं तर वाद वाढवायचे आणि मी कधीच न केलेले आरोप उगाळायचे. अगदी पाय धरून माफी मागितली तरी ते सुद्धा एक ढोंगच. काय करावं मी अशा वेळी? कसं वागावं? ती एक कोमल व्यथा आणि त्यावर हे टोका मारणं. कधीतरी मला सुख हवंस वाटलं तर त्यातही एक खुपसती सल. व्यथेची बोच. दुखरा उपकार या सगळ्यांचं डोकावणं आणि यामुळे मिळालेलं उगळतं सुख. त्या सुखाच्या उबगत्या शिरशिरीत मग ती व्यथा टवकारून पहाते. सारखी पहात राहाते.

आणि मग कधीतरी काय होतं कुणास ठाऊक? ती कॅलेंडरकडे पाहते आणि केवढीतरी दचकते. दोन महिने व्हायला आले कीं. पस्तीशी उलटली म्हणजे असं व्हायचंच. ताईलासुद्धा असंच व्हायचं आणि मग हळहळू बंद झालं चालायचंच. वय थोडंच थवकतं. दचकावण्याला मनाने दिलेली ही समजावणी. पण ताईला चार मुलं आहेत. आणि ती? असंच तिचं जीवन पायदळी पडलेल्या फुलासारखं. सैरभैर वृत्ती समजावणीला ठोकरतात.

आणि तिला वाटतं त्याने खूप खूप प्रेम करावं. अगदी पूर्वी करीत होता ना? तस्सं! फुलांची वेणी रोज रोज आणावी. झालंच तर सिनेमाला न्यावं. नाटकाला जाऊ या का? प्रेमाने विचारावं. चटक मटक खमंग खायला आणून द्यावं न सांगता सगळं कौतुक करावं.

पण त्याची उत्तरं ठरलेली.

"मी वेणी आणणार नाही. हवी तर तू घेऊ शकतेस."

"मी आपण होऊन नाटक सिनेमाचं म्हणणार नाही. तुला हवं तर म्हणायचं. मी येईन बरोबर."

बरोबर यायचं आणि जवळच्या खुर्चीवर खांबासारखं बसायचं. हौसमौज नाही. जीव उबतो अशाने. पण तिच्या या वृत्तींचा अर्थ तिलाच लागत नाही. एकीकडे वय होतंय याची भेडसावणारी जाणीव आणि त्या शून्य पोकळीत निर्माण होणारा हा ठळक बिंदू. वय झाल्यावर वाटणारी तारुण्याची ओढ.

तिच्या मनात हे वारे भिरभिरत होते. प्रेमाच्या डोंगरावरून वाहाणारे. आणि त्याचं मन उलट दिशेने वाहात होतं. वकीलाकडे जाऊन झालं होतं. बाळासाठी दुसरी बायको आणण्याचा विचार व्यक्त होत होता. पण कायदा आड येतो. म्हणजे तिला घटस्फोट? हो घटस्फोटच.

हे उलटे वारे तिच्या अंगाशी झोंवत होते. तिला असलं काहीच नको होतं. आजवरच्या प्रेमाचं हेच कां फळ? केवळ एका हळव्या व्यथेपायी? "आपण एकादं मूल सांभाळायला घेऊ या ना?"

"अंऽहं".

ओढ हटली होती. प्रेम आटलं होतं. निश्चय पक्का होता. आणि ती सारखी भिरभिरत होती. थरथरत होती. काही काही सुचत नव्हतं तिला.

आणि मग एक दिवस विचार करून तिला सारखं गरगरायला लागलं. डोळ्यापुढे अंधेरी आली. ती पलंगावर पडली.

"मला काहीतरी होतय् रे, जरा इथं बस ना!"

मी बसणार नाही. मी डॉक्टर थोडाच आहे. हवं तर डॉक्टरला बोलावतो.

"आण बापडा."

डॉक्टर आले. तिला तपासलं. काही प्रश्न विचारले आणि हसत हसत त्याच्या पाठीत थाप मारून म्हणाले.

"जीते रहो बेटा. लवकरच आम्हाला पेढे मिळणारेत".

दोघांच्या मनात आनंदाच्या लाटांवर लाटा उसळल्या. त्याचे उलटे वारे दिशा बदलून सुलट वाहायला लागले. सुखाच्या काठावर उभे राहून दोघानी उगवत्या सूर्याकडे पाहून घेतलं. ठिबकलेल्या अश्रूंची खोल व्यथा मनाला पोखरून काढत होती. पण आता त्या व्यथेची फुलं झाली होती आणि निर्मळ हसत गोड गंध पसरत ती फुलं तिला कुरवाळत होती.

औषध लिहून दिलं आणि डॉक्टर निघून गेले.

तिला जवळ घेत तो म्हणाला,

"संजू व्यथा संपली बरं संपली. आता ओल्या व्यथेतून फुल उमलणार. आणि ते निर्मळ रूप आणि प्रेमच गंध पसरणार. आता अश्रूंची फुलं झाली. ती फुलं घरात हंसणार खेळणार. मी तुला सोडून कुठं कुठं जाणार नाही ग. संजू माझी सजू.

एकमेकांच्या मिठीत दोघं सुखावत होती. दोघांचे डोळे पाझरत होते. आणि दोघांचे दुःखाश्रू दोघांच्या आनंदाश्रुमध्ये एकरूप झाले होते. ● ● ●

# ❀ गु ❀ ला ❀ ब ❀ क ❀ ळी ❀

-डॉ. सरोजिनी बाबर

**...अगदी गुलाबकळीएवढी. पण थाट अपूर्वाईचा; बांधा देखणा; बोलणं नाजूक; हंसणं गोड; चालणं ुंदर; पहाणं मनोवेधक....**

**...तो तर पार वेडावून गेला नि... वेडाने झपाटला गेला...काही वर्षांनी दुसऱ्याच वेडानं त्याला झपाटलं...तो सारं सारं विसरला नि खरंच वेडा झाला.**

**असंच** आपलं एक गाव होतं. त्या गांवच्या राजाला एकुलता एक मुलगा होता. राजा राणीचा तो लाडका. त्याची हौस मौज पुरवावी हा त्याचा छंद. त्यानं सुखी असावं हा त्यांचा आनंद. तर एक दिवस काय झालं की, राजानं आपल्या लेकाची इच्छा म्हणून मेजवानीचा बेत केला. गांवोगांवचे सरदार जहागीरदार, पावणे रावळे, इष्टमित्र, राजेरजवाडे, गावकरी, मानकरी असे पुष्कळ लोक बोलावले. फुलांच्या पायघड्या घातल्या. रत्नामाणकांची झुंबरं लावली. सोन्याची भांडी मांडली. पांची पक्वान्नांचा बेत केला. गाणं बजावणं आरंभलं. कशाची म्हणून कशाची वाण वाटू दिली नाही. आनंदीआनंद झाला.

तितक्यात काय झालं की, संध्याकाळच्या वेळी अवचितच राजवाड्यात वाऱ्याची झुळक आली. सगळयांच्या अंगावरून गेली. सगळीकडे सुंदर वासाची दरवळ सुटली. वाड्यातील माणसं हरखली. पशुपक्षी आनंदले. फुलझाडं खुलली. म्हणून सगळी माणसं वाड्यात होती ती बागेत आली. गाणं बजावणं करणारानी नाचगाणं तिथंहि केलं. सुंदर सुंदर पोरीबाळीनी नाच केला. राजपुत्राना वश करायचा बेत केला. संगीताची बहार उडवून दिली.



होता होता मग राजाराणी झोपले. पै पाहुणे निघून गेले. पण राजपुत्र तेवढा जागा राहिला. आपल्या महालातून बाहेर आला. फिरायला जायचं म्हणाला. चांदणीरात्र होती. तर एकटाच असा हा आपला राजवाडा सोडून निघाला. रातकिड्यांची गाणी ऐकत चालला. चांदोबाच्या सोबतीनं वाट मळू लागला. कुणीतरी आपल्याला खास करून बोलावीत आहे हीच त्याची भावना. म्हणून मोठ्या ओढीनंच त्यानं आपल्या पायाखालची वाट तुडवली. रान म्हटलं नाही-जंगल म्हणाला नाही. आपला उमेदीनंच निघाला हं ! आणि त्याच नादात मग तो एका भल्या मोठ्या आंब्याच्या झाडाखाली येऊन उभा राहिला. तशी कसली तरी मधुर दरवळ सुटली. झाडाच्या फांद्या मागं सारून चांदणं पुढं घुसलं. कोकिळेला कंठ फुटला. झाडाची पानं बोलकी झाली. झाडाच्या बुंध्यातून टिपरी पडघमवर पडली. नगारानौबती झडू लागल्या. तर तितक्यात काय झालं की, झाडाच्या दोन खापा झाल्या. आणिक मधूनच एक नाजूक नाजूक न् देखणी मुलगी तिथून वर आली. दिसायला अगदी लहान.

गुलाबकळीएवढी. पण तिचा थाट अपूर्वाईचा. बांधा देखणा. बोलणं नाजूक. हसणं गोड. चालणं सुंदर. पहाणं मनोवेधक. राजपुत्र तर तिला बघून वेडाच झाला. तिचं दर्शन घडताक्षणीच म्हणाला कसा, 'करीन तर हिच्याशीच मी लगीन करीन. हीच माझी राणी होईल.'

गुलाबकळीनं हे ऐकलं. ती नुसती हसली. दाही दिशांची नक्षत्रं त्यावेळी तिला सामोरी आली. तशी हा राजपुत्र पुटपुटला, "ही कोणी परी तर नाही?" 'आणि टक लावून तिच्याकडे बघत सुटला. तशी ती काही बोलली तर देवळातील लहानग्या घंटानादाचा त्याला भास झाला. म्हणून हा बघतच राहिला. तर ती पुढं आली न् बोलली, "महाराज! मला देखील आपल्याकडील मेजवानीचं निमंत्रण होतं. पण मी नाही गडे आले. म्हटलं, मी एवढी लहान. गुलाबकळीएवढी. तिथं येऊ कशी न् तुम्हाला मुजरा तरी करू कशी ? म्हणून म्हणते महाराजानी सुखी असावं. या चांदण्या रात्री माझ्या मुजऱ्याचा स्वीकार करावा."

ह्या उप्पर ह्यानं काही बोलावं की नाही? नाही वा बोलला. हावऱ्यासारखा तिला बघतच राहिला. त्याचं तिच्यावर मन जडलं. तो हलकेच पुढे झाला न् त्यानं त्या गुलाबकळीचा नाजक हात पकडला. तशी ती आपला हातमोजाच तेवढा त्याच्या हाती देत झटकन् मागं सरकली. लाजून चूर झाली. आणि अवचितच राजपुत्राचा जयजयकार करीत आली तशी दिसेनाशी झाली. झाड पुन्हा होतं तसं उभं राहिलं. संगीताच्या नाना कळा आळवू लागलं. राजपुत्र तसा मग धावला. गुलाबकळीला पकडून ठेवूया म्हणाला. पण ती पुन्हा दिसलीच नाही तर! करणार, काय मग? बसला हा मग एकटाच त्या नाजूक हातमोजाशी बोलत. म्हणाला आपल्या हातात तरी घालून बघावा तो हातमोजा. पण बाई तो हातमोजा एवढा लहाने न् एवढा नाजूक की ह्याच्या करंगळीत देखील बसेना! आता आली का पंचाईत? म्हणून मग ह्यानं त्या हातमोजाला उराशी कवटाळलं. त्याचा मुका घेतला न् आला निघून राजवाड्यात. पण कुणाला म्हणून कुणालाही काही एक कळू मात्र दिलं नाही. गपचूप आपला निजून राहिला.

दुसरा दिवस मग उजाडला. पण भल्या दांडग्या वर्षासारखा त्याला वाटला. सरता सरेना न् रात्र काही लवकर अशी येईना. ह्याच्या जीवाची घालमेल झाली. नजरेत न् मनात ती गुलाबकळी भरली. ओठांवर घोळली. शब्दांनी फुलली. आणि मग त्या नादात रात्रराणी आली. राजपुत्राला कालच्यासारखी गुलाबकळी भेटली. पण ती त्याच्या नजरेत मावेना. रत्नमाणकांच्या दागिन्यानी न् जरतारी वस्त्रालंकारानी ती चकाकत होती. तिचं रुप आणखीनच खुललं होतं. राजपुत्रानं तिला जवळ बोलावलं. तो तिच्याशी बोलत बसला. इकडच्या तिकडच्या गोष्टी रंगत निघाल्या. तशी काय गंमत झाली की, घटके घटकेला ती गुलाबकळी आकरानं मोठी होत चालली ते बघून राजपुत्राची तहानभूक हरपून गेली. त्यानं मोठ्या प्रेमानं गुलाबकळीला तिचा हातमोजा दिला. त्यावरचं जरतारी नक्षीकाम घडवून आणून त्यानं तो तिला अर्पण केला. पण आता ती मोठी झाली होती. त्यामुळं तिच्या हातात तो मोजा बसत नव्हता. म्हणून ती गुलाबकळी हसून बोलली कशी, 'माझी आठवण म्हणून असूद्या आपल्याजवळ हा हातमोजा. महाराज! माझं ऐकाल एवढं ?' आणिक त्यावर राजपुत्र काही बोलणार इतक्यात ती एकाएकीच दिसेनाशी झाली. कुठंतरी अंतर्धान पावली. राजपुत्राची त्या कारणानं निराशा झाली. तरीपण उद्या ती पुन्हा भेटेल या आशेवर त्यानं तो हातमोजा आपल्या उराशी कवटाळलं न् तो वाड्याचावर निघून आला.

त्या दिवसापासून मग त्यांची रोज अशीच गाठभेट घडत गेली. चंद्रकिरणांच्या साक्षीनं एकमेकांची मनं एकमेकांत गुंतली गेली. गुलाबकळीनं एका सुंदर तरुणीचा आकार धारण केला. राजपुत्रानं मग तिला सरळच मागणी घातली. ती आनंदली. म्हणाली, "महाराज! मी आपली राणी होईन पण माझी एक अट आहे," तशी ह्यानं तिला ती अट विचारली आणि हिनं. पण ती सांगून टाकली की, "महाराज! मी आपली इच्छा पुरी करीन. पण आपलं प्रेम माझ्याशिवाय कुणालाही मिळता कामा नये. आणि जर का आपण माझी ही अट मानली न् खरी केली तर त्या क्षणापर्यंत मी आपली होईन." राजपुत्रानं तिला होकार भरला.

दुसऱ्याच दिवशी मग राजपुत्रानं राजाराणीला ही आनंदाची बातमी दिली. राजानं तात्काळ लेकाची विनंति मानली. थाटामाटानं गुलाबकळीचं आणि राजपुत्राचं लग्न लावून दिलं. राजाराणींना ही सून फार फार आवडली. तिचं रूप त्याना देखणं दिसलं. स्वभाव मनमिळावू वाटला. तिच्या अंगीच्या नम्रभावानं त्यांना जिंकलं. त्यांना सुखाचे दिवस आले.

पण मग काय गंमत झाली की, राजाराणी तीर्थयात्रेला म्हणून निघाले. तशी त्यांना निरोप द्यायला म्हणून गांवोगांवचे मानकरी आले. राजेरजवाडे जमले. पै पाहुणे गोळा झाले. प्रजाजन आले. तरुण आले. म्हातारे आले. मुली आल्या. स्त्रिया आल्या. अशी माणसं गोळा झाली की, जत्रा काय फुलावी? तर सांगायचं म्हणजे ह्या घोळक्यात एक देखणी मुलगी पण आली होती. तिचे केस भुरे. डोळे चमकदार. हनुवटी झोकदार. नाक टोकदार. रंग बहारदार. बोलणं मनोहर. चालणं वळणदार. तशी राजपुत्राची नजर तिच्यावर खिळली. गुलाबकळीला दिलेल्या वचनाची त्याला भूल पडली न् हा आपला आला गेला सोडून तिच्याकडेच पहात राहिला !

गुलाबकळीनं ते पाहिलं न् तिला काय ते चटकिनी कळू आलं. म्हणाली, 'असू दे! महाराजांनी दिलं वचन सोडलं. आपण आपल्या माहेरी जावं'. आणिक मग तिचा आकार लहान लहान होत पुन्हा गुलाब-

कळीसारखा झाला! ती अवचितच गुप्तहि झाली.

पण बाई हे कुणाच्याच ध्यानात आलं नाही. खुद्द राजपुत्रच भुलून गेला तर बाकीच्यांची काय हो कथा? नाही का? त्यानं आपलं मन त्या नव्या पोरीला देऊन टाकलं. तेवढ्यावरच थांबला नाही तर खुशाल तिच्याशी लग्न लावून देखील मेला मोकळा झाला की!

इकडे तोवर राजाराणी तीर्थयात्रेला निघून गेले. ह्याच्यावर त्यांनी राज्याचा भार टाकला. ह्यानं पण मोठ्या खुशीनं सारं हाती घेतलं. गुलाबकळीची आठवण देखील काढली नाही ती!

पण मग मात्र एकाएकीच त्याचे डोळे उघडले हं! ही नवी बया जशी पैशाच्या न् धनदौलतीच्या मागं लागून त्याला पुरेनाशी झाली तेव्हा ह्याला खाड्दिशी जाग आली. म्हटला, 'मी हे काय करून बसलो? माझी गुलाबकळी राणी अशी नाही!' न् लागला की राजवाड्याचा काना न् कोपरा धुंडाळीत गुलाबकळीला हाका घालत फिरायला! पण आता त्याचा काय उपयोग होता? दिलं वचन ह्यानं कुठं पाळलं होतं? ह्या गोष्टीचं स्मरण झालं न् मात्र त्यानं लगोलग त्या दुसऱ्या बायकोला वाड्याबाहेर हाकलून दिली. तरीपण गुलाबकळी होतीच कुठं जाग्या-वर? आणि ह्याला कुठं माहीत होतं ती माहेरी निघून गेलेली तरी? हा आपल्याच नादात होता. तिची बिचारीची काय चूक? तिनं चांगली सात आठ वर्षं गुण्यागोविंदानं ह्याच्याशी संसार केला होता. पण ह्यानंच तर तिला फसवलीन् आता बस-लाय तिच्या नांवाच्या घोकण्या घालीत! खुशाल ओरड म्हणावं. तिचं नख दिसलं तर कशाला पाहिजे? पण म्हणतात ना . . . तशातशी गोष्ट.

राजपुत्राला झाल्या गोष्टीचा पस्तावा झाला. दिलं वचन मोडल्यानं झालेली घोडचूक त्यानं ओळखली. पण आता उपयोगच कसला होता? राज-पुत्रानं हाय खाल्ली. गुलाबकळी भेटल्या-शिवाय जगणंच नाही म्हणाला ते!

त्यानं मग चांदण्या रात्री सगळी रानं धुंडाळली. जंगलं पायाखाली तुडवली. सात वनं ओलांडून गेला. आटंग्या वनात आला. पण म्हणून सुंदर दरवळ घेऊन येणारी वाऱ्याची झुळूक सुटली नाही की, रानपाखरांनी संगीत देखील आळवलं नाही. गुलाबकळीनं नाही म्हणजे नाहीच पुन्हां आपलं तोंड दाखवलं. हा मात्र तिच्या आठवणीच्या गोण्या पाठीवर घेऊन त्या नाजूक हातमोज्याच्या लक्त-राशी गोष्टी करीत त्या आंब्याच्या झाडा-खाली बसलेला आहे. खोटं वाटलं तर कुणीहि जाऊन बघून यावं. पांढऱ्या फट्ट केसांची झुलपं न् हाडांचा सांगाडा पाहिला की, खरंच त्याची कीव येते बघा. पण ह्याचं ह्यानंच वाटोळं करून घेतलंय तर दुसऱ्यांनी त्याला काय करावं? हे बघा बाई!

गुलाबकळी बरीक शहाणी हं! तिनं बरीक दिलं वचन पाळलं. आता तिच्या नशीबानंच तिला खो दिल्यावर ती तरी बिचारी काय करील? नाही का? बोलून चालून परीच ती. तिला हो काय कमी तिच्या बापाच्या घरी? ह्याच्या धनसंपत्तीला शंभरवेळा विकत घेईल एवढी गढगंज आहे तिची स्वत:ची धनदौलत. तर हो! खोटं कशाला सांगू उगाच? पाहिजे तर तुम्ही खुद्द गुलाब-कळीलाच विचारून या. माझं काय जातंय्! तुम्हाला बरीक ती दिसेल हं! तुमच्या आमच्या एकी तिचं कांहीच म्हणणं नाही.

• • •

# कायदा

# गाढव आणि माणूस

—स. वि. करंदीकर



**.... गाढवांच्या मुलांसाठी असलेल्या 'इसापनीती'मध्ये माणसांच्या मूर्खपणाच्या गोष्टी आणि ओझी वाहणारी माणसे यांची चित्रे असतील.... माणसाला गाढव म्हणणे म्हणजे गाढवावर अन्याय करणे नव्हे काय ?**

**कायदा** गाढव आहे, ही गोष्ट गाढव कधीच नाकबूल करणार नाही. कारण माणसापेक्षा (बहुधा) गाढवेच अधिक खरे बोलत असावीत. अर्थातच त्याना बोलता येत नाही, हा त्यांचा दोष नव्हे. आणि ती ज्या भाषेत बोलतात, ती भाषा आपल्याला समज शकत नाही, हा आपलाही नव्हे.

वास्तविक कायदा आणि गाढव वगैरे गोष्टींची नेमकी याच वेळी आठवण होण्याचे तसे खास कारण नव्हते, परंतु रोम नामक शहरात घडलेली एक बातमी एका वृत्तपत्रात थोड्या दिवसांपूर्वीच वाचली आणि मग या विषयावर थोडेफार 'चिंतन' करावयाचा अजागळपणा नकळत घडून गेला.

रोम शहरातील कोण्या एका तेवीस वर्षे वयाच्या तरुणीची ही गोष्ट. तिच्या जन्माची नोंद करणाऱ्या कारकुनाने जन्मनोंदणी रजिस्टरमध्ये तिची 'स्त्री' ऐवजी 'पुरुष' अशी 'चुकून' नोंद केल्याने, तिला आता 'स्त्री' असल्याबद्दलचे सर्टिफिकेट मिळणे कठीण होऊन बसले आहे. तिने, या बाबतीत ती 'स्त्री' असल्या-बद्दलचे वैद्यकीय तपासणीचे, एक सोडून दोन डॉक्टरांचे 'दाखले' कोर्टात हजर केले, तरीदेखील 'कोर्ट' डॉक्टरांच्या दाखल्याना न मानता, तिच्या जन्माचा दाखलाच ग्राह्य मानत असल्याने, (बिचाऱ्या) त्या तरुणीला तर वेड लागायची पाळी आली आहे. असे बातमीत 'आणखी' म्हटले आहे.

अशा नजरचुकीच्या आणि अनागोंदी कारभाराच्या गोष्टी या आमच्या भारतवर्षात नेहमीच घडतात पण रोममध्येही घडाव्यात, ही खरोखरच रोमहर्षक घटनाच नव्हे काय.......?

रोममधला कारकूनदेखील चूका करतो ही 'इकडच्या' कारकूनाना एक खास बातमीच वाटेल. 'सदर चूक' करणारा कारकून व रोम जळत असताना सारंगी वाजवित बसणाऱ्या निरोचा कुणी जवळचा नातलग असण्याची शक्यता वाटते. 'सारे रस्ते रोमलाच मिळतात,' या म्हणीच्या तालावरच "साऱ्या चूका रोममध्येच घडतात," अशी नवी पुस्ती येथून जोडली जावी.

'चूका' एकंदरीत वाईटच....मग त्या 'किरकोळ स्वरू-पाच्या'—आणि भूगोलाच्या पुस्तकातील फक्त दहाच (चूक भूल द्यावी घ्यावी) असल्या, तरी त्यानेदेखील केवढा इतिहास घडतो! घोड्याच्या पायातील नालेची एक चूक निघाल्यानेच नेपोलियन वॉटर्लूची लढाई हरला. रोममधल्या कारकूनाच्या त्या चुकेने, त्या रोमन तरुणीला जीवनात केवढ्या भयंकर प्रसंगाला तोंड द्यायची वेळ आली आहे, याचा विचार केल्यावर, विषादाने 'चुकचूकत' बसण्यावांचून गत्यंतरच उरत नाही! आपल्या इक-डच्यासारखे रोममध्येही 'खुलासे' प्रसिद्ध होत असतील, आणि ते आपल्याप्रमाणेच 'प्रचंड विनोदी' असतील, तर त्या खुलाशात 'टू अर इज रोमन' असे म्हणून दिलगिरी प्रदर्शित केली जाण्याची शक्यता आहे.

'कायदा गाढव आहे' असे वाटणाऱ्या अनेक खऱ्या (आणि खोट्या) कथांना आपल्याकडे मुळीच तोटा नाही. या बाबतीत खरोखर घडलेला एक विनोदी किस्सा ऐकण्यासारखा आहे.

सरकारी पेन्शनर लोकाना प्रत्येक जून महिन्यात आपण जिवंत असल्याचा दाखला ट्रेझरी ऑफिसला द्यावा लागतो.

जून–जुलै महिन्यात काही कारणाने पेन्शन घ्यायला न जाऊ शकलेला, असाच एक वृद्ध पेन्शनर ऑगस्ट महिन्यात पेन्शन घ्यायला गेला तेव्हा कारकूनाने त्याला पैसे द्यायचे चक्क नाकारले. म्हातारा तावून तावून 'आपण ज़िवंत आहोत' हे कारकूनाला पटवून देत होता. आणि कारकून स्थितप्रज्ञाच्या शांतपणाने त्याला सांगत होता....'आपण ऑगस्टमध्ये जिवंत आहात हे मान्य आहे. पण तुम्ही जून व जुलैमध्ये मेलेला नव्हता हे कायद्याप्रमाणं (तुम्ही सर्टिफिकेट आणल्याशिवाय) मला मान्य करता येत नाही............!"

——आता बोला? . . .

....तात्पर्य काय तर "कायदा गाढव आहे!" . . .पण कायदा गाढव आहे हे मला मान्य नाही. वास्तविक कायदा आपण माणसानीच निर्माण केला . . .कायद्याच्या परीक्षा आपण माणसेच देतो. (आणि यथामती पास अगर नापास होतो) कायद्याच्या या जगात माणसे कोल्ह्यासारखी धूर्त वागतात. . कुत्र्यासारखी लाचार होतात. . .वटवाघळासारखी दोन्ही पक्षांत वावरतात. . सिंहासारख्या गर्जना करतात. . . बकऱ्यासारखी कापली जातात. . .अशा स्थितीत गाढवानेच माणसाचे असे काय घोडे मारले आहे? मला कळत नाही की, त्याने उठल्यासुटल्या कायदा गाढव आहे असे ओरडत सुटावे?

रोममधल्या त्या तरुणीने आणलेला "स्त्रीत्वाचा" वैद्यकीय दाखला तिला 'स्त्री' ठरवायला असमर्थ ठरतो, या गाढवपणालाच कायदा असे म्हणतात. अनेक चोर, खुनी, बदमाश, 'समाधानकारक पुराव्याच्या' अभावी सहिसलामत निर्दोष सुटतात या विचित्रपणालाच कायदा अशी संज्ञा आहे. वास्तविक कायदा आपण माणसानीच आपल्या फायद्यासाठी 'लवचिक' बनवला आहे.. पण आपण माणसे हुशार पडलो, त्यामुळेच–चुका-मूर्खपणा-गाढवपणा आपण करतो आणि आपल्या–पापाच्या–मूर्खपणाच्या गोणी गाढवाच्या पाठीवर लादतो. कायदा गाढव आहे या एकाच आधारावर राज्यकर्तेदेखील त्याना अप्रिय असलेल्या कैद्यांना सजा संपली तरीदेखील तुरुंगात डांबवून ठेवू शकतात. . .आणि गुन्हेगार 'बगळयाना' दया दाखवू शकतात शिवाय काही 'साधुसंत'देखील काही कैद्यांना प्रेमाने 'पोटाशी' घेतात आणि नंतर 'पाठीशी घालतात.'. . .

वास्तविक 'आराम हराम है' हा आमचा संदेश गाढवांशिवाय इतरांना फारसा समजला आहे, असे वाटत नाही. त्यामुळेच एखादा 'पद्मश्री' किंवा 'छद्मश्री'सारखा किताब गाढवालाच तांतडीने मिळणे अगत्याचे ठरत. . . .

लोक क्रांतीच्या 'तुताऱ्या' फुंकतात, लढ्याची 'रणशिंगे' फुंकतात. . .विड्या फुंकतात. . . सिगरेटी फुंकतात आणि 'दिवाळी देखील फुंकतात' मग गाढवानी उकिरडे फुंकले, तर काय एवढं विघडतं. . . .?

गाढवांवर सारखा होत असलेला हा अन्याय, गाढवे फार दिवस सहन करतील, असे वाटत नाही. . .आपली 'साक्षरता प्रसाराची' 'मोहीम' 'दिने-दिने-प्रतिदिने' शुक्ल पक्षातील चंद्राप्रमाणे वाढीस लागली, तर एक दिवस सारी गाढव जमातसुद्धा नुसती साक्षरच नव्हे, तर सुविद्य बनेल, अशी मला भीति वाटते. सहन करण्याला देखील एक सीमा असते. त्यामुळेच 'कायदा गाढव आहे ही माणसांची 'उर्मटगिरीची' भाषा गाढवे इतःपर सहन करतील असे वाटत नाही. . . अशा रीतीने उकिरड्या उकिरड्यावर त्यानी सत्याग्रहाची आणि उच्च स्वराने निषेध करण्याची रणशिंगे फुंकली, तर माणसाला आपण कोठला गाढवपणा करून बसलो असे होऊन जाईल! शिवाय गाढवेच जर अशी 'आवाज उठवू' लागली, तर उठल्या सुटल्या आवाज उठविणाऱ्या माणसाना मग उठवायला काय बरे राहील?

अशी वेळ कदाचित् उगवलीच तर समस्त वकीलानी मग पानपट्टीची दुकाने घातलेली दिसतील आणि एक (स्वतंत्र व्यवसाय म्हणून) 'कोर्टे' देखील मग 'राजीखुषीने' आणि अक्कलहुशारीने' छोटे लहान–उद्योगधंदे सुरू करतील. . .

– त्यावेळी गाढवांची मुले जी 'इसापनीति' वाचतील त्यात ठिकठिकाणी माणसांच्या मूर्खपणाच्याच गोष्टी असतील. . . .आणि माणसांच्या पाठीवर ओझ्याच्या गोणींची चित्रे दिसतील. . . . माणसाच्या मूर्खपणावर साधकबाधक चर्चा करून डॉक्टरेट मिळालेले एखादे प्राध्यापक गाढव विद्यार्थ्यांना सांगेल–"चार आण्याची चोरी करणारे गाढव गुन्हेगार ठरते पण चार हजाराची किंवा लाखाची अफरातफर करणाऱ्या गाढवाला व्यापारी किंवा पुढारी म्हणतात. . .मुलांनो. . .'कायदा माणूस आहे म्हणतात, तो याला च. . !"

– याचवेळी दरवर्षी एक एप्रिलला सारी गाढवे एकमेकाना 'माणूस' करण्याचा चंग बांधतील....

–हा क्रांती-दिवस आता फार लांब नाही. प्रत्येकावर 'दुगाण्या झाडणाऱ्या' कुण्या एका शहाण्या टीकाकाराच्या 'दिव्य दृष्टीला' तर या नव्या युगाची 'दिवास्वप्ने' आतापासूनच पडू लागली आहेत.

असो. उदाहरणार्थ–वगैरे वगैरे.. . . . . . .

●●●








( पृष्ठ १८ वरून – वरपरीक्षा )

माझे वडील पोलिस खात्यातील एक अधिकारी होते. कुठल्याहि भामटयाची मानगूट पकडून त्याच्या कानशीलात भडकावणे हेच त्यांचे मुख्य काम असावे, अशी माझी लहानपणी समजूत होती. "साल्या, एक थोथरीत ठेऊन देईन" हे त्यांचे परवलीचे वाक्य. थोथरीत ठेऊन देणे म्हणजे नेमके काय करणे हे आम्हा मुलांना समजत नव्हते. परंतु संवयीचा परिणाम म्हणून ते बाहेर भामटयांवर करीत असलेले प्रयोग घरात आमच्यावरहि करू लागले. 'थोथरीत देणे' या शब्दांची फोड आमचे थोबाड फोडूनच त्यानी करून दाखविली. पित्याच्या पेशाचा माझ्या जीवनावर एकच परिणाम झाला. आणि तो म्हणजे थोबाड रंगवून घेण्याची मला चांगलीच संवय झाली. त्यामुळे कुणी मुस्कटात मारले तर निमूटपणे गाल चोळीत बसण्याची आणि प्रसंगी ख्रिस्ताच्या शिकवणीप्रमाणे दुसरे कानशील पुढे करण्याची सहनशील वृत्ति माझ्या काळ्यानिळ्या रक्तात भिनली. मोठेपणी आपले थोबाड रंगविण्यास कुणाचेच हात सरसावत नाहीत, ते पाहून चुकल्या चुकल्यासारखे वाटू लागले. आणि मग मी नाटकात जाऊन माझे थोबाड रंगवून घेऊ लागलो.

प्र. ३: आपली आई काही व्यवसाय करते का? कोणता? किती वर्षे?

भाकऱ्या, धुणी आणि मुले बडवीत बसणे हा माझ्या आईचा व्यवसाय. फावल्या वेळात चाळीतील बायका जमवून एकमेकींच्या उकाळ्यापाकाळ्या काढीत बसण्याचाहि उद्योग ती करते. परंतु आमच्या दृष्टीने मुलांना धपाटे घालणे हाच तिचा मुख्य व्यवसाय. गेली ४० वर्षे हा व्यवसाय ती अखंडपणे करीत आली आहे. तिच्या व्यवसायात खंड पडू नये, दर दोन वर्षाला घरात पाळणा हलविला जातो. त्यामुळे धपाटे घालण्यासाठी लहान मुले सदैव तिच्या हाताशी असतात. हातावरून एक गोष्ट आठवली. ज्या हाताने ती आम्हाला चांगले धपाटे घालते त्याच हाताने ती चांगले धपाटेहि करते. धपाटे हा थालिपीठासारखा एक खमंग पदार्थ आहे हे येथे स्पष्ट केले पाहिजे. थोडक्यात पाठीत आणि पोटात 'धपाटे घालणे' हाच आमच्या आईचा व्यवसाय समजावयास हरकत नाही.

प्र.४: आपल्या शालेय जीवनात आपल्याला कोणते छंद होते? भावी जीवनात त्यांचा आपल्याला काय उपयोग झाला?

लेखन हा माझा शालेय जीवनातील सर्वात मोठा आणि आवडता छंद होता. मला लेखनाची आवड आहे हे शिक्षकांच्या ध्यानात आल्यावर शालेय हस्तलिखित मासिकाचा संपादक म्हणून माझी नियुक्ति झाली. त्या मासिकाची संपादकीय धुरा वाहण्यासाठी माझ्यापेक्षा दुसरा समर्थ हात शाळेला मिळाला नाही. सबंध हस्तलिखित मासिक मोत्यासारख्या वळणदार अक्षरात एकहाती, एकटाकी लिहू शकतो तो संपादक. लेखन करणे म्हणजे अक्षरशः लिहिणे, मान आणि बोरू मोडेपर्यंत लिहिणे, अशीच माझी त्यावेळी समजूत झाली. मोठमोठ्या वृत्तपत्रांचे आणि मासिकांचे संपादक सबंध वृत्तपत्र किंवा मासिक दस्तुर खुद्द म्हणून कसे लिहित असावेत याचे मला त्यावेळी आश्चर्य वाटायचे आणि त्यांच्या अचाट लेखनसामर्थ्याबद्दल अफाट कौतुक वाटायचे. पदवीधर झाल्याबरोबर मी खरोखरच एक धुरंधर लेखक झालो. लेखनिक म्हणून मला तावडतोब नोकरी मिळाली. सबंध ऑफिसमध्ये माझ्याइतका लिहिण्याचा सोस असलेला अन्य पुरुष नव्हता. (कारण ऑफिसमध्ये मी सोडून सर्व स्त्रियाच होत्या. त्यांच्या हातात टाक असा मी पाहिलाच नाही. टांके घालण्याची सुई मात्र सदैव त्यांच्या हातात असे आणि दिसे. भरतकाम, वीणकाम आणि रहस्यकथांचं वाचन याखेरीज त्या दुसरं काही करीतच नसत.) खर्डे घासणारे लोक म्हणजे फर्डे लिहिणारे लेखक हे समीकरण खरे मानल्यास शाळेतील छंदामुळेच मी पुढे एक फर्डा लेखक झालो असे मानावयास काहीच हरकत नाही.



**मुसाफिर–**

एक होता मुसाफिर
त्याला लागली बोट
सोन्याच्या चिपा—
ओकले त्याचे पोट.

**आचारी–**

बोटीवरल्या आचाऱ्याने
'डिनरला' केला 'लेट'
कारण होते संपावर
सारे पापलेट.

**नवकवी–**

एक होता नवकवि
त्याला लागली बोट
तेव्हा त्याने ओकल्या
वात्रटिका साठ.

—ह. शि. खरात

प्र.५: विश्व विद्यालयात माणसाच्या जीवनाला आकार येतो. आपल्या जीवनाची जडणघडण होण्यास आपले विश्वविद्यालयीन जीवन कितपत कारणीभूत झाले?

विश्व विद्यालयात जीवनाची जडणघडण होण्यापेक्षा जिवाची 'उलघाल' अधिक होते असा माझा अनुभव आहे. कॉलेज हा इंग्रजी शब्द 'कलिजा' या उर्दू शब्दावरून आला असावा अशी माझी प्रामाणिक समजूत आहे. कारण हॉटेलमधील इराणी 'कलिजा फ्राय' करताना काळजाची जेवढी उलथापालथ करीत असेल त्यापेक्षा अधिक उलथापालथ कॉलेजमधील राणी करते. इराण्याप्रमाणे कॉलेजमधील राण्या काळजाची ससेहोलपट करतात. आश्चर्याची गोष्ट म्हणजे प्रत्येक कॉलेजकुमाराला कॉलेजमध्ये कुणी ना कुणी राणी भेटतेच. कॉलेज-

मध्ये असताना माझ्याहि काळजाला हात घातला गेला. कॉलेजमधून बाहेर पडताना पदवीबरोबरच पद्मिनीहि घेऊन मी बाहेर पडेन अशी सर्वच कॉलेज कुमारांप्रमाणे माझी कल्पना होती. परंतु फक्त पदवीच पदरात पडली. पद्मिनी दुसऱ्याचा पदर धरून पसार झाली. नाही म्हणायला प्रेमाचा तवा तापला असताना कवितांच्या अनेक पोळ्या भाजल्या गेल्या. माझा पोळे हा काव्यसंग्रह या पोळ्यातूनच निष्पन्न झाला. शिमगा गेला तरी कवित्व उरते या चालीवर पद्मिनी गेली तरी पद्य उरले. माझी आजची पद्यरचना करण्याची प्रवृत्ति पद्मिनीने पोसलेली आहे. माझ्या विश्वविद्यालयीन जीवनाची एवढीच एक कमाई!

**प्र.६:** तुम्ही आपला रिकामा वेळ कसा घालविता?

न्हावी रिकामा राहिला तर तो भिंतीला तुंबड्या लावीत बसतो. काही लोक रिकामपणी 'रिकामपणाचे उद्योग' करतात, फावल्या वेळी टिवल्या-बावल्या करीत बसतात. रिकाम्या वेळी माणसाच्या हातून कधीच चांगले काम होत नाही. म्हणून रिकाम्या वेळी उद्योग करण्याचा धंदा मी कधीच केला नाही. रिकाम्या वेळी काम करणे म्हणजे रिकामी वेळ निकामी करणे. रिकाम्या वेळी मी रिकामाच रहातो.

**प्र.७:** नोकरीत आपले आणि आपल्या वरिष्ठांचे संबंध कसे आहेत?

वरिष्ठाने वरिष्ठांशी चांगले संबंध ठेवले तरच नोकरी टिकून राहू शकते. मी अद्याप नोकरीत टिकून आहे याचा अर्थ वरिष्ठांशी माझे संबंध चांगले आहेत हे उघड होय. प्रत्येक वरिष्ठाला आपला कनिष्ठ मूर्ख आहे असे वाटते. हा मूर्खपणा पदरी घ्यायला कनिष्ठ तयार नसला, तर कुणाच्या पदरी त्याने नोकर म्हणून राहूच नये. त्यामुळे वरिष्ठ–कनिष्ठ संबंध बिघडतात. आपण नोकरी धरली हाच मुळात मूर्खपणा केला असे मी मानत आलो आहे. त्यामुळे वरिष्ठाने मला मूर्ख म्हटले तर तो सत्यच बोलतो आहे असे मी मानतो. वरिष्ठाने आपल्याला मूर्ख ठरवावे ही गोष्ट काही हळवे कनिष्ठ उगाचच मनाला लावून घेतात. आपला वरिष्ठहि कुणाचा तरी कनिष्ठ आहे आणि त्यालाहि मूर्ख मानणारा कुणीतरी वरिष्ठ आहे असे मनाचे समाधान करून घेत या मूर्खांच्या तोंडी लागण्यात अर्थ नाही अशा पोक्त विचाराने मी नोकरी करतो. सर्व ऑफिस म्हणजे मूर्खांचा बाजार आहे आणि आपण शहाणे असूनहि मुद्दाम मूर्खांसारखे वागतो आहोत अशा विचाराने नोकरी केली की मनुष्य कोडगा होतो. त्याचे वरिष्ठांशी संबंध चांगले रहातात असा माझा अनुभव आहे.

**प्र.८:** प्रत्येक माणसाचे काही विशिष्ट गुणदोष असतात. आपल्याला आपल्या गुणदोषांचे मूल्यमापन करता येईल का?

प्रत्येकाला गुणदोष असतात हे मीहि आपल्याप्रमाणे कबूल करतो. माझ्याविषयी विचाराल तर मजजवळ अनेक गुण आहेत, दोष एकहि नाही असंच मी सांगेन. स्वतःचे दोष स्वतःला माहित झाले असते तर आज मानवाची फार प्रगति झाली असती आणि स्वतःचे दोष स्वतःच्या तोंडाने सांगणारे महाभाग या जगात असते तर प्रत्येक माणूस महात्मा झाला असता. आपण मला फक्त माझ्या गुणांविषयी विचारावे. दोषांविषयी जाणून घ्यायचे झाल्यास माझ्या शत्रूंना विचारावे. (सोबत माझा द्वेष, मत्सर करणाऱ्यांची यादी जोडली आहे) ह्यांची मनेहि पूर्वग्रहदूषित आहेत हे कृपया ध्यानात घ्यावे. स्वतःच्या गुणांविषयी मी लिहिले तर आपण त्यावर विश्वास ठेवाल का? रामदासाप्रमाणे 'तो एक मूर्ख जाणावा' म्हणून माझी संभावना तर करणार नाही ना? स्वतःचा मोठेपणा स्वतः सांगणारा माणूस आपल्याला पसंत पडेल का? ते काहीहि असो आपण विचारले म्हणून सांगतो–मी एक 'गुणी माणूस' आहे आणि परदेशातच माझ्या गुणांचे चीज होईल असे मला प्रामाणिकपणे वाटते. पिकते तिथे विकत नाही हेच खरे.

(मला विचारण्यात आलेल्या शेकडो प्रश्नांपैकी फक्त आठ प्रश्नांची उत्तरे मी वानगीदाखल दिली आहेत. या प्रश्नांची उत्तरे वाचल्यावर माझी परदेशात रवानगी होईल असे आपल्याला वाटते का? नाही ना? मलाहि तसंच वाटत होतं! परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे परदेशात पाठविण्यासाठी माझी पटकन् निवड झाली. वरपरीक्षेत मी उतरलो, आणि उत्तीर्णहि झालो. बहुतेक उमेदवारानी आपल्या प्रश्नांना दांभिक आणि खोटी उत्तरं दिली होती आणि प्रामाणिक उत्तरे देणारा मीच एकमेव उमेदवार होतो असे संचालकांनी मागाहून मला सांगितले. जगात मीच एक प्रामाणिक मनुष्य आहे असं मला वाटत होतं. पण नाही, या योजनेचे संचालकहि मला फार प्रामाणिक वाटले. ●●●





अनुक्रमणिका

डॉ. युरी झिवॅगो आणि लारा
[ओमर शरीफ आणि ज्युली ख्रिस्ती]

--प्रा. सुरेश गजेंद्रगडकर

" सुखाने जीवन जगण्यासाठी केवळ प्रेमाची गरज आहे, लग्नाची नाही".— ज्यूली

जन्माने भारतीय, कर्तृत्वाने आंतरराष्ट्रीय लौकीक मिळविणाऱ्या अव्वल अभिनेत्रीची ही जीवन गाथा....

# ज्यूली ख्रिस्ती

## ऑस्कर विजेत्या नटीचा परिचय

'मृदुला' जेव्हा 'कृत्या' होते.
लाराच्या भूमिकेत ज्युली ख्रिस्ती

'**डॉक्टर** झिवॅगो'मधील लॉराची भूमिका कुणाला द्यावी हा प्रश्न निर्माते व दिग्दर्शक ह्याच्यासमोर उभा राहिला. कारण त्यात काम करणारी नटी अत्यंत समजूतदार हवी होती. आणि ज्यूली ख्रिस्तीचा 'डार्लींग' हा सिनेमा पाहून डेव्हिड लीन ह्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या दिग्दर्शकाने तात्काळ निर्णय घेतला की ते काम ज्यूली ख्रिस्तीने करावे. तिचे डार्लींग-मधले काम जगात सर्वोत्कृष्ट ठरून त्याला यंदाचे ऑस्कर पारितोषिक मिळाले.

ही ऑस्कर विजेती नटी जन्माने भारतीय आहे. तिचा जन्म आसाममध्ये झाला. तिच्या वडलांच्या मालकीचे चहाचे मळे होते. पुढे त्यानी आपल्या पत्नीशी घटस्फोट घेतल्याने ज्यूली वयाचे सहाव्या वर्षी पुन: इंग्लंडला परतली. आणि वयाच्या १७ व्या वर्षापर्यंत तिचे अतिशय हाल झाले. इंग्लंड–वेल्स–फ्रान्स अशा शिक्षणानिमित्त तिच्या अनेक फेऱ्या झाल्या. वयाच्या १६ व्या वर्षी तिला फ्रान्सला पाठविण्यात आले. "माझा खरा जन्म पॅरिसमध्ये तेव्हा झाला. म्हणजे जीवनात खरा रस तेव्हा निर्माण झाला." असे ती स्वत:च्या पूर्वायुष्यासंबंधी बोलताना म्हणते.

पुढे १७ व्या वर्षी Central School of Dramatic Art मध्ये तिने प्रवेश मिळवला आणि तिथे तिला तिचा सूर सांपडला. तोपर्यंत ती एक अत्यंत बुजरी विद्यार्थिनी म्हणून ओळखली जाई. तिला एकांत अधिक प्रिय असे. ती अत्यंत 'मूडी' म्हणून प्रसिद्ध होती – (आणि तशी ती अजूनहि आहे.) 'स्वतंत्र विचाराची व अनपेक्षित वागणारी अशी मी आहे. आणि मी कुणालाच भीत नाही' हे तिचे स्वत:विषयीचे मत.

### लग्नापेक्षा केवळ एकत्र राहणे पसंत

तिच्या स्वतंत्र विचारांची एक झलक म्हणजे डॉन बेझंटबरोबरचे तिचे संबंध. डॉन बेझंट हा आज जरी एक कलावंत व शिक्षक असला तरी त्यांचे प्रेम जमले त्या वेळी ती दोघे 'पोस्टात काम करीत






अनुक्रमणिका

होती. आणि आज तिला थोडी जरी सुट्टी मिळाली तरी वेझंट तिच्याकडे जातो व ती दोघे सुखाने एकमेकांच्या संगतीत काळ काढतात. मात्र त्यांचे लग्न झालेले नाही, हे लक्षात ठेवण्याजोगे आहे.

"आम्ही लग्न ह्या विषयावर बोललो आहोत. सुखाने जीवन कंठण्यासाठी फक्त प्रेमाची गरज आहे. लग्नाची नाही. माझे डॉनवर विलक्षण प्रेम आहे. त्याच्याखेरीज जीवनाचा विचारहि मला अशक्य आहे. तो जवळ नसला तर मला विलक्षण एकटेपण जाणवते." असं ती ह्या संबंधात सांगते. कदाचित् आपल्या आईवडलांच्या लग्नाचे अपयश व त्यामुळे स्वतःला भोगावे लागलेले अनन्वित कष्ट ह्यांच्या आठवणीने तिने हा निर्णय घेतला असावा.

त्या काळात तिला झोपायला जागा नव्हती. Air Mattress (सतरंजी) कांखेत घेऊन ती अनेक ठिकाणी हिंडत असे. कधी सार्वजनिक बागेत तर कधी जिन्याखाली, कधी कुणा मित्र-मैत्रिणीकडे असे तिला करावे लागे. त्या हलाखीच्या परिस्थितीशी आता तुलना केल्यास (जवळ जवळ २ लक्ष डॉलर्स एका कामासाठी मिळतात) जमीन-अस्मानाचा फरक आहे.

"मला यशाची भीति वाटते. यशाने, पैशाने मी बदलेन असे मला वाटते. मी काहीही आंखीव वागले नाही. जसे घडले तसे घडू दिले. आता मात्र फार काळजी वाटते". ज्यूलीचे मनात असे विचार असतात.

तिने नाटकात किंवा टेलिव्हिजनवर काम करायला सुरुवात केली, ती 'स्वतःला विसरण्यासाठी !' नाटकात काम करताना तितका काळ ती पूर्णपणे पात्राच्या मनःस्थितीत स्वतःला झोंकून देई व त्यामुळे सत्य परिस्थितीपासून सुटका मिळे. तिचा अभिनयांवर विलक्षण जीव आहे. 'मला आयुष्यात फक्त अभिनय करायचा आहे. बाकी काही नाही !' एव्हढेच तिचे मागणे आहे.

डेव्हिड लीनसारखा समर्थ दिग्दर्शक, इंग्रिडबर्गमनसारखी सुक्ष्म अभिनयाबाबत ज्ञान असलेली नटी, उमर शेरीफसारखा नव्या तडफेचा नट ('डॉ. झिवॅगो'चा नायक) व इतर अनेक हॉलीवूडमधील ज्ञात्यानी 'ती एक श्रेष्ठ नटी आहे' असा तिचा गौरव केला आहे.

'डॉ. झिवॅगो'च्या सेटवर ज्या ज्या वेळी ज्यूलीचे काम असे त्या त्या वेळी सर्वांना विलक्षण उत्सुकता असे. कारण डेव्हिड लीनसारख्या दिग्दर्शकाशी सामना ती एकटी देत असे.

लीनने म्हणावे "ज्यूली, तू ही वाक्ये ह्या प्रकारे म्हण हं!"

ज्यूलीने तात्काळ सांगावे "नाही. डेव्हिड, मला वाटते लॉरा असं बोलणार नाही. ती अशा प्रकारे बोलेल."

लीनने दोन्ही प्रकारे बोलणे ऐकावे आणि खिलाडूपणे तिचे म्हणजे खरे असण्याची कबुली द्यावी.

आणि असे प्रसंग वारंवार घडत असत!

ह्याला कारण ज्या पात्राचा अभिनय आपण करणार आहोत त्या पात्राविषयींची असामान्य व असाधारण समज तिला आहे.

सर्वांना ती आवडते; प्रसंगी तिच्याशी भांडण होऊन सुद्धा, कारण ती मनाने निर्मळ आहे, स्वतःशी व आपल्या धंद्याशी विलक्षण प्रामाणिक आहे, साधी आहे. (चार चौघात नटी म्हणून ओळखू सुद्धा येत नाही) आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे स्वतःच्या व्यक्तिमत्वाशी ती प्रामाणिक आहे. त्यामुळेच 'बिली लायर'-सारख्या चित्रपटात काम केल्यावरहि ती महिना १०० डॉलर्स पगारावर नाटकात काम करण्यास तयार झाली.

वयाच्या २५ व्या वर्षी (१४ एप्रिल रोजी २५ पुरी झाली) इतके अफाट यश, अमाप लोकप्रियता मिळाली असूनही त्याची तिला काही फिकीर नाही.

उमर शेरीफ तिला म्हणाला, "you are very sexy!"

तिने सांगितले, "I do not know about sexy bit. I have an air of abandonement!"

ह्यातच तिच्या व्यक्तिमत्वाचे सार आले!

●●●
















## प्रत्ययकारी न वाटणारा कथा-संग्रह

**भुतांच्या** गोष्टी म्हणजे भीतियुक्त कुतुहलाचा मनावर जबरदस्त पगडा बसविणारा अनुभव. असला अनुभव घेण्याबद्दल मानसशास्त्रज्ञांचा सल्ला भिन्न संभवेल. पण भुतांच्या गोष्टी सांगणं आणि ऐकणं हा प्रकार तसा पुष्कळच पुरातन आहे. मात्र पुरातन म्हणजे जुना नव्हे. किंबहुना कधीही जुना न होणारा असाच हा विषय. जोवर मृत्यू अमर आहे तोवर भुतांच्या गोष्टींना मरण नाही. म्हाताऱ्या कोताऱ्यानी मुला-नातवंडाना भुतांच्या गोष्टी सांगितल्या आहेत. बाया-बापडयानी रिकामपणी त्या तोंडी लावल्या आहेत. तरुण पोरासोरानी तासन् तास त्या चवीने चर्चिल्या आहेत. किंबहुना शाळकरी मुलानाही या गोष्टींचं वावडं नाही. मृत्यू म्हणजे काय हे समजण्याइतकं वय झालेल्या कुणालाहि 'भूत' ही कल्पना कुठल्याही वेळी आणि कुठेही भेटू शकते. आणि एकदा अशी तिची गांठ पडल्यानंतर तास.....तास झपा झपा निघून जातात. अगदी या कल्पनेबद्दल अविश्वास असणाऱ्या माणसाचे सुद्धा. कारण हा अविश्वास हा या कल्पनेबद्दलच्या कुतुहलाचाच आणखी एक प्रकार.

प्राणीमात्राच्या मृत्युनंतरच्या अवस्थेबद्दल माणसाच्या मनात एक कुतुहल कायम वस्ती करून आहे. 'भूत' ही कल्पना नेमकी या कुतुहलाला ढोंगसते. त्याला काही आवाहन करते. चक्क नादी लावते. हे सारं खरं का खोटं...? खोटं का खरं..? असा चमत्कारिक संभ्रमाचा खेळ मनात सुरू होतो. भीतीच्या भावनेचा प्रत्यय देणारा आणि तरीही मनोरंजक वाटणारा. हा असला खेळ अधिकाधिक रंगविणं हीदेखील एक कलाच. तिन्ही सांजेच्या वेळी अंगणातल्या एखाद्या पारावरच्या बैठकीत किंवा घरातली रात्रीची जेवणं उरकल्यानंतर जोडलेल्या गप्पांच्या मैफलीत हमखास हा खेळ रंगविणारी माणसं अनेकाना अनेकदा भेटली असतील.

'अद्भुत' या कथासंग्रहात सौ. वसुंधरा पटवर्धनानीही सरळ सरळ भुतांच्याच गोष्टी सांगितल्या आहेत. गोष्टीत विविधता आणण्याचा बाईंनी जाणीवपूर्वक प्रयत्न केला आहे. पण याच प्रयत्नात त्या नेमक्या निर्माण केलेल्या 'Fabricated' झाल्या आहेत. लेखिकेच्या मनात रुजून आलेल्या गोष्टी त्या वाटत नाहीत. प्रत्येक कथेची कल्पना एकाहून निराळी असली तरी प्रत्येक कथा रचताना वापरलेला अद्भूत घटनांचा मसाला एकाच पद्धतीचा झाला आहे. त्यामुळे एकाहून दुसरी गोष्ट भिन्न झालेली असली तरी ज्यांच्या गोष्टी सांगितल्या आहेत ती 'भुतं' गोष्टीतून जिवंत झालेली नाहीत. ती जिवंत व्हायला योग्य वातावरणाचीच आवश्यकता होती. आणि ते वातारवरण पकडायला पिशाच्च कथांची बैठक हमखास रंगविणाऱ्या माणसाच्या कथन पद्धतीची आराधना लेखिकेच्या लेखणीने करायला हवी होती असं वाटतं. अशा रंगलेल्या बैठकीत गोष्ट सांगणाराहि गौण ठरतो. प्रत्यय येत रहातो तो अंगावर शहारे आणणाऱ्या तरी सुखावह वाटणाऱ्या वातावरणाचा. चमत्कारिक भीतीच्या भावनेचं छातीवर ओझं जाणवतं पण तरीही ते फेकून द्यावंसं वाटत नाही. बाईंच्या या कथा वाचून असा काही प्रत्यय येत नाही. उलट पुष्कळ ठिकाणी अकारण लांबलेला बुद्धीवाद आवश्यक त्या वातावरणापासून वाचकाला दूर न्यायलाच कारणीभूत होतो. एकंदरीत भुतांच्या गोष्टींची ही बैठक 'हमखास' रंगवणं बाईंना जमलेलं नाही. आता आहेत त्या परिस्थितीतही कथात डावं उजवं ठरवायचं झालं तर संग्रहातल्या 'मालक' या कथेच्या उंचीपुढे बाकीच्या कथा ठेंगण्या वाटतात.

एक समर्थ कथा लेखिका म्हणून मराठी वाचकाला वसुंधराबाईंची ओळख आहे. बाईंच्या या कथा फसल्या असल्या तरी याच कथा लिहिण्याच्या त्यांच्या प्रयत्नात त्या अधिक सामर्थ्यवान झाल्याचीच ओळख पटते. कारण काही तरी निराळे लिहिण्यासाठी त्या अस्वस्थ होतात आणि म्हणूनच अशा पिशाच्च कथा लिहायला त्या प्रवृत्त होतात. लेखिकेचे हे अस्वस्थ होणे मला विशेष महत्वाचे वाटते. **—सुरेश वेंगुर्लेकर**

[ **अद्भुत**. लेखिका—**वसुंधरा पटवर्धन**. बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई २. मूल्य ४ रु.]

## कथांचा 'तोल' साधलेला कथा-संग्रह

**निवडक** कथांचा संग्रह 'हा ठरीव ठशाचा परिचय संग्रहाच्या पहिल्या पृष्ठावर जेव्हा जेव्हा आढळतो तेव्हा 'न निवडलेल्या' कथांचा संग्रह. आपणाला अजून पहावयाचा आहे, याची मला पुनः एकदा आठवण होते. याही कथासंग्रहाने हे स्मरण दिले आहे. शिवाय संग्रहातील कथेच्या शेवटी, सत्यकथा' 'दीपावली', 'नवयुग' आदी मासिकांतून त्यापूर्वी प्रसिद्ध झाल्याचा उल्लेखहि आहे. वर वर पुस्तक चाळणाऱ्या वाचकाच्या मनात यदाकदाचित् कथांच्या 'निवडकपणा'विषयी काही संदेह निर्माण होणार असलाच तर तो दूर व्हायला आघाडीवरच्या मासिकांचा हा नामोल्लेख अवश्य उपयोगी पडावा.

तल्हारांच्या या निवडक कथासंग्रहाचं नांव आहे–'तोलरेघ'. मोठं मार्मिक आणि कलापूर्ण असंच हे नामाभिधान. 'अनुक्रमावरून' नजर फिरवितानाच 'तोल रेघेत्' 'तोल' सांपडतो. तशीच 'रेघ' मात्र सांपडत नाही. पण म्हणून ती नाहीच असे मानण्याचे कारण नाही. किंबहुना ती साऱ्याच कथांतून अदृश्यरूप असणार आहे





अनुक्रमणिका

आणि तिच्याच स्थिर... अस्थिरतेवर या कथांचा कलात्मक तोल आपण अजमावणार आहोत.

विषयापुरती तल्हारांच्या या कथांतील कथावस्तु तशी नवीन नाही. यातल्या बहुतेक कथा रोजच्या संसारातल्या, किंवा पोटाचा काही उद्योग करताना घडलेल्या घटनांतूनच उम्या झाल्या आहेत. काही थोड्या यौवन सुलभ प्रणयभावनेच्या कुठे कठोर तर कधी कोमल कलात्मक आविष्कारातून घडल्या आहेत. हे सारे 'खास नवीन' नसले, तरीहि शेवटी कथावस्तुला त्या त्या लेखकाचा घडलेला स्पर्श हाच महत्त्वाचा. तो किती स्वतंत्र...किती सकस याचंच खरं कौतुक. परिचीत-अपरिचीत कुठल्याहि विषयातून लेखकाने दिलेला हा स्वतंत्र अनुभव हेच कथेच्या यशाचं गमक. तल्हारांच्या या साऱ्याच कथाना 'त्यांचा' असा स्पर्श आहे. प्रत्येक कथेतून त्यानी हा स्वतंत्र अनुभव अवश्य दिला आहे. आता प्रत्येक कथेतून हा अनुभव एकदा घेतल्यानंतर पुन: प्रत्येक कथेची उंची निराळी मोजायला हवीच असे नाही. कारण एकदा हा अनुभव घेतल्यानंतर तो कुणाला कसा आणि किती कमीअधिक तीव्रतेने जाणवावा हे शेवटी वाचकाच्या भिन्न भिन्न प्रकृतीवरच अवलंबून रहाते.

तल्हारांची भाषा सोपी...सरळ आणि गतिमान. जे सांगावयाचे आहे त्याचाच केवळ वेध घेऊन निघणारी. त्यामुळे अप्रस्तुत संदर्भाची अडगळ कुठे आढळत नाही. शिवाय त्यांच्या कथेतील माणसं 'जिवंत' करण्यासाठी वर्णनापेक्षा संवादाचेच माध्यम ते अधिक पसंत करताना दिसतात. हे माध्यम त्याना जमलेही आहे. आणि नुसतेच जमलेले नाही तर ते स्वत: ही त्या जमण्यावर खास खूष असावेतसे वाटते. कारण याच खूषीत कधी कधी हे संवाद वाढू नयेत इतके वाढतात. क्वचित् प्रसंगी त्यांचा तोलही ढळतो. आणि मुलाच्या आणि मातोश्रीच्या संवादातून ते लिहून बसतात—

'अग माझ्या लाजेचं काय घेऊन बसलीस? लाज तर तिला वाटायला पाहिजे! तू तिला सुलभाचं (मुलाची बायको.) एक पोलकं दिलं होतं ना?'

'हो दिलं होतं. ते तिच्या अंगात बघून तुला तुझ्या बायकोची आठवण झाली का?'

'काही तरीच काय बोलतेस आई. ते पोलकं तिने घातलंच नव्हतं!'

'मग काय ती बिनापोलक्यानं भावाबरोबर सिनेमाला आली होती म्हणतोस?'

संवादातून क्वचित् कुठे असा ढळलेला तोल दुर्लक्षीला तर मात्र एरव्ही 'तोलरेषे'तील साऱ्याच कथांचा तोल तल्हारानी कलात्मकतेने साधला आहे.

—सुरेश वेंगुर्लेकर

[तोलरेघ—ले. मनोहर तल्हार. वा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई–२. मूल्य ४ रु.]

# दिवाळी अंकांतील एकांकिका

कादंबऱ्यांच्या मानाने एकांकिकांचे प्रमाण कमी आहे. स्वतंत्र, रुपांतरित किंवा आधारित एकांकिका ह्यांच्या जोडीला, 'लेखकाच्या परवानगीवांचून प्रयोग करू नये' अशा आशयाच्या तळटीपा असणारे सगळे 'संवादवजा' साहित्य जमेला धरले तरी ही संख्या तीसाच्या आतच भरते, तरीपण, गेल्या दीड एक तपाच्या काळात मराठी रंगभूमीवर – प्रायोगिक आणि व्यावसायिक अशा दोन्ही प्रकारच्या रंगभूमीवर जे उत्साहाचे वारे खेळत आहे, ते एकांकिकांच्या निर्मितीस अनुकूल आणि प्रेरक आहे, यात शंका नाही. रंगभूमीवरील निर्मितीत येत असलेली सुजाण कलादृष्टी, तंत्रदृष्टचा लेखनात येत असलेला लवचिकपणा, आणि आशयाच्या भिन्न भिन्न पातळ्यांच्या शक्यतेची लेखकाला होत असलेली जाणीव, ही ह्याच वातावरणाची द्योतक आहेत. ह्या एकांकिकांच्या लेखनामागील प्रेरणा निरनिराळ्या प्रकारच्या असल्या तरी ठळकपणे तीन चार प्रवृत्ती त्यात कल्पिता येतात. एकाद्या अनुभवाच्या भावनाट्यांतील उत्कट काव्य वा कारुण्य ह्यांचा वेध घेणारी, एक प्रवृत्ति; 'फार्सिकल' रचनेतील विविध लयींतील विलसितांचा न्यास साधणारी दुसरी प्रवृत्ति; खुसखुशीत उपहासाने रंगभूमीवर हलके-फुलके वातावरण निर्माण करणारी तिसरी प्रवृत्ति; 'थ्रीलर' किंवा 'सेन्सेशनल' नाट्याचे वातावरण निर्माण करून कृतक रोमान्स किंवा कृतक साहस रंगभूमीवर उभे करणारी चौथी प्रवृत्ती, आणि प्रहसन किंवा विडंबन ह्यात दिसून येणारी, आणखी एक प्रवृत्ति, अशा प्रकारच्या प्रवृत्ति स्थूलमानाने कल्पिता येतात. रत्नाकर मतकरी ह्यांची 'मधुवंती' आणि विद्याधर पुंडलीक ह्यांची 'रंग', ह्या दोन, आता उल्लेखिलेल्या पहिल्या प्रवृत्तीतील ठळकपणे लक्षात भरणाऱ्या एकांकिका होत. रत्नाकर मतकरींच्या एकांकिकेतील वातावरण निर्मिति विशेष लक्ष वेधून घेणारी आहे. चित्रपटाची हिरॉइन मधुवन्ती हिला पटकथालेखक, दिग्दर्शक, आणि प्रोड्यूसर ह्यांच्या बोलण्यातून व त्यांनी केलेल्या चित्रपटासंबंधीच्या चर्चेतून ज्या Psychological Suggestions अभावितपणे मिळतात त्यांचा परिणाम म्हणजे ती स्वत:ला प्रेमात फसविणाऱ्या; त्या दिग्दर्शकाचा गळा दाबून खून करते व स्वत: आत्महत्या करते. चित्रपटात कल्पिलेल्या पण वास्तवात अशक्य वाटलेल्या दृश्यासारखी मधुवंतीची मनोरचना आणि तिला मिळालेल्या सायकॉलॉजिकल सजेशन्स ह्यामुळे केवळ चमत्कृतीपेक्षा एका गडद करुण नाट्याचाच परिणाम येथे मनावर होतो. पुंडलीकांच्या 'रंग' ह्या एकांकिकेत नटाच्या आयुष्यात क्षणभर चमकून विसरून गेलेले एक स्वप्न आहे. रंगभूमीवर आयुष्यभर 'एकच प्याल्या'तील 'भगीरथा'चा दुय्यम रोल करणाऱ्या विसुभाऊला झुंझाररावाचा–हीरोचा रोल मिळणार ह्या कल्पनेने क्षणभर जे विलक्षण अवसान चढते, पुनर्जन्म झाल्यासारखे वाटते, नटराजाचा वर







मिळाल्यासारखे वाटते, प्रकाशाचे, रंगाचे वस्त्र दिसू लागते–ते अवसान प्रत्यक्ष ती वाक्ये उच्चारू लागताच कोसळून पडते, स्वतःच्या दुय्यमत्वाची जाणीव विकटपणे हंसू लागते. पतीच्या कर्तृत्वाच्या मर्यादाची जाणीव असणारी; अंतःकरणात व्यथित असणारी, आणि तरीहि त्याच्या स्वप्नांशी समरस होणारी, त्याला शांतपणे समजावणारी राधा ही व्यक्तिरेखा ह्या एकांकिकेतील करुण नाट्याला तोल आणि वजन प्राप्त करून देते. 'रंग'-मधील अनुभवालाच मुळात एक उंची आणि सुबक आकार आहे.

तारुण्यात पदार्पण केलेल्या मुलीच्या भाळावर रुळणारी बट आणि ती पाहून घरातील वेगवेगळ्या व्यक्तींच्या होणाऱ्या प्रतिक्रिया ह्यावर आधारलेली दि. बा. मोकाशी ह्यांची 'बट' ही एकांकिका, किंवा पुरुषाची प्रेमविषयक कल्पना आणि स्त्रीला अपेक्षित असलेली ओढ ह्यातील फरक दाखविणारी शं. गो. साठे ह्यांची 'ओढ' ही एकांकिका ह्या दोन्ही एकांकिका पुरेशा फुलत नाहीत, म्हणून परिणामकारक होत नाहीत. प्रौढ, संसारी स्त्रीला अनेक नाती, अनेक जबाबदाऱ्या असूनहि आतून तिला जाणवणाऱ्या एकाकीपणाचे चित्रण, ज्योत्स्ना देवधर, ह्यांनी 'संध्याछाया भिवविती हृदया' ह्या एकांकिकेत केले आहेळात. मुत विषय चांगला असूनहि ते चित्रण त्रोटक, एकसुरी म्हणून परिणामहीन झाले आहे. 'ब्रह्मांडाची पोकळी आणि अवकाशाच्या आकाशातील पोल' ह्या विचित्र शीर्षकावरूनही विजय तेंडुलकरांच्या ह्या वर्षीच्या एकमेव एकांकिकेच्या फार्सिकल पातळीची सहज कल्पना येईल. सुरुवातीच्या रंगसूचनांनी त्याला साजेसे वातावरण निर्माण होते. मॉडर्नआर्टच्या पेंटिंग्जचे एक प्रदर्शन, तेथे जमलेले कलेचे असंख्य तथाकथित दर्दी आश्रित, त्यांचे अभिप्राय, रंगीबेरंगी बाया, त्याना सांभाळणारे पुरुष, त्यांचे कल्चरल संवाद, ह्या सगळ्या विश्वाकडे भाबडेपणाने पाहणारा तरुण, त्याचा पंढरपूरचा एक समवयस्क मित्र, त्याच्या रांगड्या प्रतिक्रिया, अशा विविध घटकांतून ह्या एकांकिकेची रंगत चढत जाते. चित्राच्या आशयावरून गंभीरपणाने हुज्जत घालणारा एक दाढीवाला अखेर एक पाकिटे मारणारा चोर निघतो व साथीदारासह यशस्वीपणे पोबारा करतो तर झोपेतून उठलेला खरा चित्रकार उलटे टांगलेले चित्र सरळ करू लागतो म्हणून त्याच्याच नावाने लोक चोरचोर असा ओरडा करतात अशी एक झटकन् कलाटणी देऊन शेवटी ख्रिस्ताच्या मुद्रेत तेंडुलकर त्या चित्रकाराला उभा करतात, तेव्हां त्या मुद्रेच्या केवळ सूचकतेने आधीच्या त्या तथाकथित कल्चरल जगाच्या कलादृष्टीचा आणि चर्चेचा उथळपणा, आणि पोकळपणा, अधिकच कर्कश वाटतो आणि विरोधाने उघडा पडतो. निव्वळ विनोद निर्मितीच्या हेतूने लिहिलेल्या स्वतंत्र एकांकिकांमध्ये प्रा. वसंत कानेटकर ह्यांची 'व्याप कुणाचा ताप कुणा,' ही, आणि वसंत सबनीस ह्यांच्या 'कुटुंब नाटकात काम करते', आणि 'निरोप', ह्या एकांकिकांचा विशेष उल्लेख केला पाहिजे. नातवाच्या प्रेयसीला वाड्यात पाऊल टाकताच एकाएकी पूर्वजन्मीची आठवण होऊन आपण आजोबांची तरुणपणी मृत्यु पावलेली पहिली बायको आहोत, ह्या जाणीवेने सगळीकडे उडालेला घोटाळा, आणि तिच्यावर उपचार करण्यास जादूगार आणताच नातवाला अचानक पूर्वजन्मीची आठवण होऊन तो त्या जादूगाराचाच बाप निघणे, अशा घोटाळ्यांतून उद्भवलेल्या प्रसंगातील विनोद, हा कानिटकरांच्या एकांकिकेचा विषय आहे. बायकोने कीचकवध नाटकात, भीमाची भूमिका घ्यावयाचे ठरविल्यामुळे नवऱ्यावर ओढवलेली आफत आणि अखेर तिच्यामुळे त्याची झालेली सुटका ह्या प्रसंगावर सबनिसांची, 'कुटुंब नाटकात काम करते', ही एकांकिका आहे तर 'निरोप' ह्या एकांकिकेत आत्महत्या करायला निघालेल्या तरुणाला ती आत्महत्या तो प्रेमभंगामुळे करीत आहे की बेकारीमुळे असा प्रश्न विचारून त्याचा मित्र वेगवेगळ्या युक्त्यांनी ती आत्महत्या लांबवतो व अखेर नोकरी मिळाल्याचे पत्र येताच त्याच्या विचाराला कलाटणी मिळते. ह्या तिन्ही एकांकिकांच्या रचनेत एक तऱ्हेचा सराईत सफाइदारपणा आहे. पण त्यातील कलाटण्या काहीश्या पूर्वकल्पित आणि ठराविक चाकोरीकडे नेणाऱ्या आहेत. शं. ना. नवरे ह्यांची, 'काला पहाड' ही एकांकिका आणि बाळ गांगल ह्यांची 'भयंकर खून' ही एकांकिका ह्या दोन्ही एकांकिकातील सुरुवातीचे वातावरण रहस्य आणि उत्कंठा निर्माण करणारे असले तरी दोन्ही एकांकिकांचे शेवट साधे, प्रभावी, कलाटणी न देणारे आहेत. आधी निर्माण केलेल्या वातावरणाच्या मानाने फिके आहेत. उमाकांत ठोमरे ह्यांची 'रविवार' ही एकांकिका पतिपत्नीतील प्रेमळ संवाद संपवून तेथेच थांबते तर गो. के. भटांच्या 'एका दुपारी' ह्या एकांकिकेत केवळ काही दृश्यांची मांडणी आहे. वसंत फेणे ह्यांची 'संस्मरणिका याने एक सुन्न भाजीराव' ह्या विडंबनाची स्फूर्ति 'एक शून्य बाजीराव', ह्या नाटकामध्ये आहे हे शीर्षकावरूनहि सहज लक्षात येईल. हे खुसखुशीत विडंबन किंवा नाट्यवेडचाचे एकत्र दर्शन घडविणारी, भालबा केळकर ह्यांची 'ड्रॅमॅटिक असायलम' ही एकांकिका ह्यांतील विडंबनाला एक दर्जेदार पातळी असली तरी अखेर त्याचे आवाहन त्या विश्वाशी निगडित असणाऱ्यापुरतेच अपरिहार्यपणे राहते.

'तो मीच' हे प्रहसन प्रा. अनंत काणेकरांनी लसाज ह्या १८ व्या शतकातील लेखकाच्या कृतीवर आधारलेले आहे. तर मुक्या पत्नीला बोलकी करून घेतल्यावर अखेर पतीवर बहिरेपणा स्वीकारण्याची आफत ओढवते, ह्या Dumb Wife and Deaf Husband ह्या एकांकिकेवर 'हो मुकी तू हो मुकी' ही के. रा. फडणीस ह्यांची एकांकिका आधारलेली आहे. जनार्दनमुळे, हा एक ब्रह्मचारी कारकून, त्याच्या खोलीवर रात्रभर राहून, त्याला लुबाडणारी अंजली माने ही छटेल छोकरी, त्याचा शेजारी दिनू, आणि घराची मालकीण मावशीबाई ह्यांचा जनूविषयी झालेला निराळाच गैरसमज, ह्यांमुळे जनूची भानगड लपून उलट डॉक्टर, नर्स आणि पोलिस, ह्यांच्या कोंडाळ्यात सांपडलेला जनू, अशी एक वेगळीच गंमत सरिता पदकी ह्यांच्या 'एका रात्रीची चित्तरकथा', ह्या एकांकिकेत घडते. हीही एकांकिका रुपांतरितच आहे.

ह्याखेरीज पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक विषयांवर अनेक हेतूनी व प्रकारानी लिहिलेले लिखाण आहे. पण ते 'संवादात्मक' आहे, एवढ्या पलिकडे कोणत्याहि दृष्टीने विचारात घेण्यासारखे नसल्यामुळे, त्याचा प्रपंच येथे केलेला नाही.

—प्रा. रमेश तेंडुलकर

अनुक्रमणिका






## आलेखन कला

**महाराष्ट्र** राज्य–स्थापनेनंतर तांत्रिक व शास्त्रीय वाङमय मराठी भाषेतही विपुलतेने तसेच अल्प किमतीत उपलब्ध व्हावे म्हणून महाराष्ट्र राज्य शासन–साहित्य आणि संस्कृति मंडळ कार्य करीत आहे. त्यांच्या सक्रीय साह्याने श्री. खाडिलकर यांची सदर दोन्ही पुस्तके जिज्ञासू चित्रकार तसेच चित्रकलेचे उपासक याना उपलब्ध झाली आहेत. त्याचबरोबर कुंचल्याशी चाळा करण्या-इतपत पोच आलेल्या माध्यमिक शालेय विद्यार्थ्यांना, तसेच ड्राइंगच्या 'एलिमेंटरी' व 'इंटर' श्रेणीतील अभ्यासूना या दोन्ही पुस्तकांद्वारे उत्तम मार्गदर्शन प्राप्त होते. पण खरे सांगावयाचे तर प्रत्येक रसिकाने आस्वाद घ्यावा इतकी ती दोन्ही पुस्तके परिपूर्ण आहेत.

**भाग १**:– ड्रॉइंग बोर्डच्या निवडीपासून प्रत्यक्ष कलाकृती रेखण्यापर्यंत लागणाऱ्या अनेक साधनांची व्यवस्थित माहिती देऊन श्री. खाडिलकर यानी आपल्या चतुरस्त्र नजरेची झलक प्रारंभीच दाखविली आहे.

रेषा, वर्तुळ, फरशी, कौले, लाकूड आदि विविध माध्यमां-साठी आलेखनांचे सचित्र तंत्र अव्वल–अखेर नजर खिळवून ठेवते (पान एक ते एकशेदोन.) 'ब्लॅक अँड व्हाइट'मधील संपूर्ण ड्राइंग्जप्रमाणेच सहा कलर–प्लेटस्‌ही असल्याने, कलेतील कला-कुसर समजून घेणे सुलभ झाले आहे. निसर्ग–सौंदर्य रंगविण्या-बाबत प्रस्तावनेतील सूचना मौलिक आहेत. पान ८२ ते १०२-वरील आलेख वाढत्या श्रेणीने अधिकाधिक परिश्रमपूर्ण, फिगर्स-युक्त आणि अनेक छटांनी नटविलेले असल्याने, अभ्यासकांच्या तयारीचे दृष्टीनेच सबंध पुस्तकाची मांडणी श्री. खाडिलकर यानी केल्याचे दिसून येते.

**भाग २** (पाने १६४ शिवाय चौदा कलर-प्लेट्स्) श्री. खाडिलकर यांनी दुसऱ्या भागामध्ये आलेखनाच्या सिद्धांताची व त्यातील बारकाव्यांची माहिती दिली आहे. स्कुल ऑफ आर्टस् तसेच चित्रकला–पदवी परीक्षार्थी तसेच चित्रकार म्हणन काही किमान दर्जा मिळविलेल्या परंतु त्या क्षेत्रातील नवख्या तसेच अॅमिचुअर्स या व्याख्येत बसणाऱ्या मंडळींसाठी दुसरा भाग उपयुक्त व मार्गदर्शक आहे. याही पुस्तकात श्री. खाडिलकर यानी आवश्यक साधनसामग्रीपासूनच माहिती देण्यास प्रारंभ केला आहे, हे विशेष.

आलेखनांचे सिद्धांत, चित्र–माध्यमाची निवड, कमर्शियल आर्ट, लेटरिंग, फिगरिंग, न्यूड्‌स् आणि कमर्शियल व बेसिक ड्रॉइंग–यांचा मिलाफ असलेल्याही कलाकृतींचे आलेख दुसऱ्या भागात आहेत. पाने–फुले, फळे, पशु–पक्षी व मानवी आकृतींचे निरनिराळे डौल त्या आलेखाद्वारे नवशिक्यांना सुलभपणे समज-तात. तर कलावंताना नवनवीन आलेखनांची प्रेरणा देतात.

श्री. खाडिलकर यानी सदर दोन्ही पुस्तके मराठी भाषेत लिहून एक वैशिष्टयपूर्ण स्थान मिळविले आहेच. तसेच चित्र-कला ही आंतरराष्ट्रीय ठेव असल्याने भाषेची अडचण न भासता इतरानाही ती दोन्ही पुस्तके तितकीच उद्‌बोधक खचितच वाटतील.

**–चित्रगुप्त**

[**आलेखन–कला**–भाग १ व २ (किंमत १० रु. प्रत्येकी). लेखक–**चिं. ह. खाडिलकर,** ए. एम्. उज्जैन. प्रकाशक–**सौ.** प्रभावती चिं. खाडिलकर ऋणी–निवास, फ्री–गंज, उज्जैन.]

---

( पान १० वरून–प्रसाद )

रमाबाई पुढे सरकल्या. बैराग्याचं बोलणं ऐकताना त्यांचं लक्ष त्याच्या मुद्रेवर खिळलं. ऐकता ऐकता त्याना एकदम जाणवलं की, त्या बैराग्याचे डोळे लुकलुकताहेत. त्या डोळ्यात ज्योति तेवताहेत. आतापर्यंत ह्या ज्योति आपल्या लक्षात कशा आल्या नाहीत ? त्या ज्योतीनी रमाबाईंचा सारा जीव वेधला. इतर साऱ्या गोष्टींचं भान त्या विसरल्या. त्या ज्योति डोळ्यात आत खोल खोल जाऊ लागल्या. त्यांच्याबरोबर रमाबाईहि आत शिरू लागल्या. जणु रमाबाईंचं अस्तित्व त्या ज्योतीहून वेगळं नव्हतंच. आत जाता जाता अंधार उजळला आणि एका नदीचं पात्र दिसू लागलं. ही अलकनंदा. समोर बद्रीनारायणाचं मंदिर. मंदिराच्या मागे हिमशिख-रांची रांग. स्वच्छ, नितळ, प्रसन्न वातावरण. रमाबाई ध्यान-धारणा आटोपून आपल्या निवासाच्या बाहेर मोकळ्या वाऱ्यावर उभ्या आहेत. अंगात थंडीची सुखकर शिरशिरी भरली आहे. पूर्वेला सूर्य तळपत आहे. कोवळ्या उन्हात वातावरण उल्हसित झालं आहे, हिमशिखरं चमकताहेत. रमाबाई मनात म्हणताहेत, "ह्या तीर्थ-भूमीच्या परिसरात तडी तापसी राहतात म्हणे. कित्येकांची तप-श्चर्या शतकानुशतकं चालली आहे. जगाला विसरून हे महात्मे आपल्याच एकांतात रमले आहेत. अशा महात्म्यांचं दर्शन आपल्याला घडलं तर ? आपल्याच अंतरातल्या शांतीत जगण्याचं रहस्य आप-ल्याला त्यांच्याकडून कळू शकेल. पण कुठे शोधायचे हे योगी-जोगी?"

आपल्याच विचारात मग्न असता रमाबाईंची नजर दूरवर पोहो-चते—हिमशिखरांच्या रांगेपर्यंत. एक बर्फासारखी शुभ्र आकृति दुरून येत असलेली दिसते. आकृति त्यांच्याच रोखाने जवळ येऊ लागते. मग त्याना ओळखू येतं की, ती आकृति मानवी आहे. तो एक पांढरा वेष केलेला तरुण साधु आहे. त्याची कांति गव्हाळी आणि सतेज आहे. त्याच्या मुद्रेवर विलक्षण शांति आणि प्रसन्नता आहे. तो रमाबाईंच्या पुढ्यात येऊन उभा राहतो.

'अल्लख निरंजन ! माई, नारायणाचा प्रसाद घेतला ?'

'होय महाराज.'

रमाबाई पापणी न लवता त्याच्याकडे पहात आहेत.

'शांति मिळाली ?'

काय उत्तर द्यावं ते रमाबाईंना सुचेना. पण त्या साधूच्या मुद्रेत असा काही आकर्षक गोडवा आहे की नकळत त्यांच्या तोंडून निघतं,








अनुक्रमणिका

'नाही महाराज. शांति देणारा महात्मा शोधते. पण आम्हा संसारातल्या किड्यांना कोण महात्मा भेटणार ?'

'तुझी शांति तुझ्यातच शोध, माई. एखादा महात्मा तुला फक्त वाट दाखवू शकेल त्या शांतीच्या शोधाची.'

'तेवढं तरी माझं भाग्य कुठे आहे, महाराज ?'

'माई, तुझं संचित बलवान आहे. त्याच्या बळावर तुला सगळं मिळेल. हा घे प्रसाद.'

तो साधु उजव्या हाताची मूठ बांधून हात रमाबाईपुढे धरतो. रमाबाई दोन्ही हातांची ओंजळ त्याच्यापुढे करतात. मूठ त्या ओंजळीत उघडते. त्या मुठीचा स्पर्श होताच विजेच्या स्पर्शाप्रमाणे एक लहर त्यांच्या टाळूपर्यंत जाते. आपलं अंतरंग उचंबळून येत आहे असं त्याना वाटतं. तो साधु हात काढून घेतो. रमाबाईंच्या ओंजळीत चंदनाच्या दोन ओबड धोबड लहानशा पादुका उरतात. रमाबाई भानावर येतात. त्याना साधूच्या पाया पडायचं आहे. पण रिक्तहस्तानं साधुसंताना नमस्कार करण्याची त्यांची रीत नाही. त्या लगेच साधूला म्हणतात, 'थांबा महाराज. मी दक्षिणा आणते.'

दक्षिणा आणण्यासाठी रमाबाई लगबगीने घरात जातात. अकरा रुपये हाती घेऊन त्या परत येतात. पण पाहतात तर तो साधु तिथे नाही. त्या सभोवार पाहतात. लांबवर दृष्टि फेकतात—त्या हिमशिखरांच्या रांगेपर्यंत. कुठेच तो साधु दिसत नाही. अलकनंदेचा खळखळाट तेवढा कानात घुमू लागतो. हा काय चमत्कार! खरंच का हा महात्म्याचा प्रसाद ? रमाबाई ओंजळीतल्या त्या इवल्याशा पादुकांवर डोकं टेकतात. मग दूर त्या हिमशिखरांकडे पहात ओंजळ मिटून प्रणिपात करतात. मग नुसत्याच दूरवर पहात राहतात.

पहाता पहाता ते दृश्य अंधारात विरलं, आणि त्या दोन हसऱ्या ज्योति त्या वैराग्याच्या डोळ्यात तेवत राहिल्या. रमाबाई भारल्या-










सारख्या त्या ज्योतींकडे एकतार पहात राहिल्या.

"आठवतं का ? मी पादुका दिल्या होत्या." वैराग्याच्या मुद्रेवर मंद स्मित झळकलं.

रमाबाई भानावर आल्या. पण तरी त्याना त्या ज्योतींवरून नजर काढता आली नाही इतकी त्यांची दृष्टि त्या वैराग्याच्या डोळ्यात खिळून गेली होती.

दोन वर्षांपूर्वी घडलेला तो प्रसंग आज पुन्हा घडला होता. त्याचं सत्य आजवर त्याना कळलं नव्हतं. आपल्याला तो नुसता भास तर झाला नाही ना ? ही शंका आजवर त्यांच्या मनात कायम होती. पण त्या भासातून लाभलेल्या पादुका आजवर त्यांच्या पूजेत होत्या. तो जर भास होता तर ह्या पादुका कोणी दिल्या ? आज पादुका मिळाल्या नाहीत; पण तो प्रसंग पुन्हा घडला. रमाबाईंच्या सर्व जाणिवेला वाटत होतं की, तो प्रसंग खरोखरी पुन्हा घडला आहे. पण वस्तुस्थितीत त्याची काहीहि खूण त्यांच्या हाती नाही. वस्तुस्थितीत आहे ते फक्त या जादूगार वैराग्याचे संमोहक डोळे आणि त्यातल्या त्या ज्योति. आपल्याला पुन्हा भासच तर झाला नाही ? या वैराग्यानं आपल्यावर नजरबंदी तर केली नाही ? आपल्याला दिसलं ते इथे दुसऱ्या कोणी पाहिलं नाही ?

रमाबाईंनी बाजूच्या बायकांकडे नजर टाकली. त्या सगळ्या जणी जागच्या जागी खिळल्यासारख्या,उत्कट अधीरतेनं,रमाबाईंकडे पहात होत्या. इतकं अधीर बनवणारं काय त्याना रमाबाईत दिसत होतं कोण जाणे. रमाबाईंनी पुन्हा आपली दृष्टि वैराग्याकडे वळवली. तो शांत बसला होता. त्याची मुद्रा किंचित् हंसत असावी. त्याच्या डोळ्यात त्या ज्योति अजून तेवत होत्या; त्या ज्योति अजून रमाबाईंना वेधून घेतल्या होत्या.

"आठवलं का तुला ? पटली ओळख ?"

"आठवलं महाराज. पण त्या वेळी आपण असे नव्हता. आपण तरुण होता, कफनी पांढरी होती."

"अग, हिमालयातून खाली लोकात उतरल्यावर एवढा फरक होणारच माणसात. इकडे उन्हातान्हात धुळीत हिंडावं लागतं ना !"

हे खरं नव्हतं. केवळ उन्हा तान्हात हिंडल्यानं माणूस इतका बदलू शकत नाही. तीस-चाळीस वर्षांचा तरुण दोन वर्षात पाऊणशे वर्षांचा वृद्ध होऊ शकत नाही. मग हा बैरागी असं कां सांगतो ?

रमाबाई अविश्वासानं वैराग्याच्या तोंडाकडे पहात राहिल्या. त्या डोळ्यातील ज्योति पुन्हा आत जाऊ लागल्या आणि पांढरी कफनी घातलेला एक वैरागी त्यात दिसू लागला. त्याला दाढी-मिशा नाहीत. डोक्यावर केस नाहीत. त्याची मुद्रा करारी आणि तुकतुकीत आहे. हातात लांब सोटा आहे. गंगेच्या प्रवाहावर अलगद तो उभा आहे.

रमाबाईंना एकदम ओळख पटलीसं वाटलं. त्या बैराग्यात आणि समोर बसलेल्या बैराग्यात साम्य होतं. मग त्या वैराग्यात आणि बद्रीनारायणाला भेटलेल्या तरुण साधूतहि साम्य आहे असं त्याना जाणवलं. मग एकदम त्याना तो प्रसंग आठवला. त्या आठवणीनं त्यांचं अंग शहारलं.

"आणखी एकदा तुला भेटलो आहे मी. आठवतं ना ?"

"ओळखच पटतेय्, महाराज." पाण्याच्या प्रवाहावर उभ्या असलेल्या त्या वैराग्याकडे पहात रमाबाई म्हणाल्या—जणू स्वतःशीच.

समोर गंगेचं विस्तीर्ण पात्र पसरलं आहे. रमाबाई आपल्या निवासात सज्जात बसून गंगेच्या प्रवाहाकडे बघत आहेत. त्यांचा निवास गंगेच्या काठावरच आहे आणि त्यांच्या खोलीच्या खालूनच गंगा वहात आहे; त्यामुळं सज्जात बसलं की, गंगेच्या प्रवाहात होडीत बसल्यासारखं वाटतं. सज्जात बसून गंगेचा तो अथांग पान्हा पाहत राहण्याचा त्याना छंद आहे. हरद्वारला आलं की, गंगेची आंघोळ करणं हा त्यांचा नित्यनेम असतो. पण आज थंडी बरीच पडली आहे आणि त्याना अंगात जरा कणकण वाटत आहे. म्हणून खाली उतरून आंघोळीला जाण्याची त्याना आज मनाई आहे. पण गंगामाईच्या शीतल धारेत देह डुंबवल्याशिवाय त्याना स्वस्थ वाटणार नाही. म्हणून बसल्या बसल्या त्या गंगेची आळवणी करतात— 'गंगामाई ! आज तू मला न्हाऊ घालायची नाहीस ?' विसरलेल्या मनानं गंगेकडे पहात स्वतःशी असं बडबडत असतानांच तो बैरागी पलिकडच्या मैदानातून चालत येत असलेला त्याना दिसतो. तो सरळ पाण्यावरून अलगद पावलं टाकीत येतो. समोर प्रवाहात उभा राहतो. आणि ओणवून ओंजळीनं पाण्याचा एक झोत रमाबाईंकडे फेकतो. त्या पाण्याचा चकचकीत तलम गरुडपंख रमाबाईपर्यंत वेगानं झेपावतो आणि त्यांच्या अंगावर शीतल तुषार उडतात. रमाबाईंचं सर्वांग शहारतं. अंगावरील वस्त्र ओलं होतं—

आणि त्या ज्योति पुन्हा पुढे पुढे सरकू लागल्या. बैराग्याच्या डोळ्यांच्या वाहुल्यात त्या स्थिर झाल्या.

कित्येक वर्षांपूर्वी हरद्वारला घडलेला हा प्रसंग आपल्याच मनाचा काही तरी खेळ म्हणून रमाबाईंनी केव्हाच मनातून काढून टाकला होता. त्या वेळी अंगावरचं पातळ खरोखरीच भिजलं का, ते पाहण्यासाठी त्यानी ते वारंवार चाचपून पाहिलं होतं. थंडीमुळं कापड गार होतं म्हणून उगीच आपल्याला भिजल्यासारखं वाटतं, असं त्यानी स्वतःला समजावलं होतं. 'हो, काकी. खरंच तुझं पातळ ओलं आहे. बसल्या बसल्या कसं ग भिजलं?' म्हणून त्यांच्या पुतणीनं ग्वाही दिली होती. तरीहि तो प्रसंग केवळ एक भास आहे असं मानून त्यांनी त्याच्याकडे दुर्लक्ष केलं होतं. पण आज तोच प्रसंग त्यानी पुन्हा अनुभवला. त्यातला प्रौढ बैरागी बद्रिनारायणाला भेटलेल्या तरुण बैराग्याच्या किती तरी आधी त्यानी पाहिला होता. दोन वर्षात तरुणाचा वृद्ध होत नसेल तर कित्येक वर्षांपूर्वीचा प्रौढ दोन वर्षांपूर्वी तरुण कसा झाला? आजचा वृद्ध, दोन वर्षांपूर्वीचा तरुण, कित्येक वर्षांपूर्वीचा प्रौढ, ही तिन्ही एकाच माणसाची रूपं आणि ही तिन्ही रूपं म्हणजे हा समोर बसलेला बैरागी ? मग ह्या बैराग्याचं खरं रूप कोणतं ? त्याचं खरं वय किती ?

पण विचार करायला रमाबाईंचं चित्त ठिकाणावर नव्हतं. आणि त्या वेळी तरी संशयाला थारा नव्हता. त्या समोर तेव-






णाऱ्या दोन ज्योति इतक्या निर्मळ होत्या, इतक्या शांत होत्या, इतक्या संमोहक होत्या की, त्यांच्यासमोर मनात काही किंतु येऊच नये, त्यांच्याखेरीज दुसरं काही जाणिवेत टिकूच नये. त्या ज्योतींकडे पहाता पहाता रमाबाईंना गदगदून आलं. भान हरपल्यागत त्यांनी वैराग्याच्या पायांवर डोकं टेकलं. वैराग्यानं आपला उजवा हात त्यांच्या डोक्यावर ठेवला. त्या पायांच्या अन् हाताच्या स्पर्शानं रमाबाईंना शांत वाटलं. देवाच्या पायाशी वाहिलेलं आपण एक दळदार निर्व्याज फूल आहोत अशी भावना त्यांच्या मनात निर्माण झाली.

"ऊठ बेटा, ऊठ." वैराग्यानं रमाबाईच्या खांद्यावर हात ठेवून त्याना उठवलं—त्या बसल्यावर बैरागी मिस्किलपणे म्हणाला— "हरद्वारला जातेस की नाही आता?"

"दोन वर्षांपूर्वी बद्रीनारायणाला गेले होते तेव्हापासून जाणं झालं नाही, महाराज. इकडेच व्याप वाढताहेत खूप."

"अरे अरे! गंगास्नानाशिवाय तुला बरं वाटत नसेल मग," बैरागी गंमतीनं म्हणाला.

"नेहमी गंगास्नान घडायला फार पुण्याई लागते, महाराज. पण मी काही गंगामाईला विसरत नाही.

मागच्या खेपेला तिचं तीर्थ बरंच घेऊन आले आहे. रोज पूजेत थोडं थोडं वापरते. कधी लहर लागली म्हणजे तेच थोडंसं आंघोळीच्या पाण्यात घालून गंगास्नानाचं समाधान मानते." रमाबाई खेळकरपणे म्हणाल्या.

"बरं. चल, ये. इथेच गंगास्नान घालतो तुला." असं म्हणत बैराग्यानं आपली कुबडी रमाबाईच्या डोक्यावर उंच धरली.

तोच त्या कुबडीतून फवाऱ्यासारख्या धारा रमाबाईंच्या अंगा-वर वर्षू लागल्या. रमाबाई आसनस्थ बसावं तशा ताठ बसल्या. त्यांनी डोळे मिटून घेतले आणि तो तीर्थवर्षाव त्या अंगावर घेऊ लागल्या. त्या वर्षावानं त्या अंतर्बाह्य ओल्याचिंब झाल्या. गंगामाईच्या धावत्या प्रवाहातच आपण डुंबलो आहोत असं त्यांना वाटलं. अंतरात उचंबळणाऱ्या सुखाच्या लहरी कंठाशी येऊन त्यांचा गळा भरून आला आणि डोळ्यातली आसवं त्या तीर्थात मिसळली. रोमरोमातून फुटून पडणारं हे अपार सुख. त्यावर पोहणारं जीवपाखरू. चारही मुक्तीची दारं आपल्याला मोकळी झाली आहेत. आणि वाऱ्यानं हलणाऱ्या तरंगाप्रमाणं आपण त्या मुक्तीच्या आनंदसागरात विरून जात आहोत, असं रमाबाईंना वाटू लागलं.

रमाबाईंच्या अंगावर सांडणारं तीर्थ घेण्यासाठी बायका पुढे सरसावल्या होत्या. पण बैराग्यानं डावा हात आडवा धरून त्याना मागेच थोपवलं होतं. सांडणाऱ्या पाण्याचा लोट रमाबाईंच्या भोवतीच जिरत होता.

मग धार एकाएकी बंद झाली. वैराग्यानं काठी मागे घेतली. मग तो रमाबाईंना म्हणाला, "झालं तुझं गंगास्नान?"

रमाबाई भानावर आल्या. त्यांनी डोळे उघडले. पण त्यांच्या तोंडून शब्द उमटेना.

"ठीक आहे. आता मी जातो. पण माझे शब्द लक्षात ठेव— आपल्या मनानं वागू नकोस. आदेश मिळेल तो पाळ." आणि वैरागी पाटावरून उठू लागला.

काय बोलावं हे रमाबाईंना सुचेना. अजून त्या आपल्याच तंद्रीत होत्या. काही न सुचून त्या म्हणाल्या,

"मी आपली काय सेवा करू, महाराज?"

"तू कसली सेवा करतेस माझी? आहेच काय तुझ्याजवळ द्यायला? त्या ताम्हनात थोडं गंगाजल साठलं आहे तेच घाल पळीभर माझ्या हातावर. मीच दिलेलं तीर्थ मी घेतो." आणि मग हसत तो पुढे म्हणाला, "हो. म्हणजे गंगेचं गंगेला परत."

रमाबाईंनी पळीभर तीर्थ बैराग्याच्या हातावर घातलं. ते पिऊन वैरागी उठला. म्हणून रमाबाईहि उठल्या. तेवढ्यात ती पोक्त बाई बैराग्याच्या पायांवर डोकं ठेवून म्हणाली, "महाराज! आम्हालाहि आपला प्रसाद द्यायचा होता."

तिच्या मागून इतर बायकाहि एक एक बैराग्याच्या पाया पडल्या.

"हे घ्या माझं भस्म," असं म्हणून बैराग्यानं कुबडी हवेत उंच धरली. तिच्यातून पिठासारखी विभूति पडू लागली. प्रत्ये-कीनं ती विभूति ओंजळीत घेऊन मस्तक नमवलं.

मग वैरागी दाराकडे वळला. रमाबाई त्याला पोचवण्यासाठी तशाच ओल्या वस्त्रानिशी मागून निघाल्या. आपल्या देहातून काही तरी बाहेर निघून आपल्या पुढे जात आहे असा त्याना भास होऊ लागला. ताठ शरीरानं चाललेल्या त्या बैराग्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात चालता चालता रमाबाईंच्या तोंडून ओढलेला उद्गार निघाला— "आता पुन्हा आपलं दर्शन केव्हा होणार, महाराज?"

"वेळ आली म्हणजे," मागे वळून रमाबाईकडे स्निग्ध दृष्टीने पहात बैरागी म्हणाला.

उंबरठ्यात पोचल्यावर रमाबाई पुन्हा बैराग्याच्या पाया पडल्या. बैरागी खालच्या पायरीवर उतरला. तेवढ्यात रमा-बाईंना आठवलं—ऑफिसचं काम करीत दुसऱ्या खोलीत बसून असलेल्या त्यांच्या भावाला महाराजांचं दर्शन घडलं नव्हतं. म्हणून उंबरठ्यातूनच आत वळून त्यांनी हाक मारली, "दादा! बाहेर ये रे जरा."

दादा बाहेर येत असावा.

रमाबाईंनी पुन्हा उंबरठ्याबाहेर पायरीवर उभ्या अस-लेल्या बैराग्याकडे मान वळवली. पण पायरीवर कोणीच नव्हतं. एवढ्यात कुठे गेले महाराज? त्यांनी दाराबाहेर सभोवार पाहिलं. रस्त्यावर कोणीच नव्हतं. आजूबाजूची अन् रस्त्याच्या पलिकडची घरं जशीच्या तशी उभी होती.

●●●
















# आज नवा इतिहास घडे

**भारतातील** लोकशाही आता संपुष्टात आली आहे, ही सार्वत्रिक निवडणुक-ही बहुधा अखेरचीच ठरणार आहे, भारतीय जनतेला लोकशाही पचविता आलेली नाही, ती विकत घेतली जाऊ शकते, मतपेटीच्या मार्गाने. ह्या देशात काँग्रेसला पराभूत करणे केवळ कठिण नव्हे, अशक्यच आहे. सरकारी राज्य यंत्रणा निवडणुकीत अनेक 'चमत्कार' घडवून आणते आणि मग राज्यकर्त्या पक्षाच्या इच्छुकांचा पराभव करणे अशक्य होते. मतपेटया 'फुटतात' 'फोडता' येतात. खोटया मतपत्रिका टाकता येतात. पेट्यासुद्धा पळविल्या जातात, मग ही कसली निवडणुक ? ही तर लोकशाहीची क्रूर विटंबना वगैरे विधाने निवडणुकीच्या आधी फार मोठ्या प्रमाणात केली जात होती. आजही कुठेकुठे त्यांची चर्चा होते आहे. विशेषतः 'काश्मीर'मधली निवडणुक म्हणावी तशी 'स्वच्छ'पणे पार पडली नाही अशी चर्चा चालू आहे. 'नॉमिनेशन पेपर्स'च्या पहिल्याच लढाईत काश्मीर काँग्रेसने पहिला पराक्रम गाजविला आणि २२ असेंब्ली व २ लोकसभेच्या जागा गिळंकृत केल्या. प्रत्यक्ष लढत दिल्यशिवाय हा 'विक्रम' सादिकसाहेबांच्या नेतृत्वाखाली त्या प्रांतातल्या काँग्रेसने केला व 'नंदनवन' आमच्या हाती आहे याची ग्वाहीच जणु दिली. ह्या 'विक्रमा'बद्दल तेथील व अन्य भारतीय जनतेने मोठे आश्चर्य व्यक्त केले. परंतु आश्चर्याचा आणखी धक्का नंतरच्या काळात तिला बसला. जम्मू काश्मीर मधली निवडणुक फेब्रुवारी २१ ला व्हायची होती. पण दि. २० लाच छांब विभागातील चार मतदान केंद्राच्या जागा अचानकपणे बदलण्यात आल्या. १९।२० ला भरपूर पाऊस झाल्याने **मनावर-तावी** नदीला पूर आला. नवी मतदान केंद्रे काहीना तर चाळीस मैलाच्या अंतरावर होती. तावीला पूर आला होता आणि तरीही त्या नव्या मतदान केंद्रावर मतदान मात्र ८० ते ९० टक्के झाले. **बदून** ह्या मतदान केंद्रावरील मतदान **सकाळी ११–४५ लाच** पूर्ण झाल्याचे जाहीर करण्यात आले. आणि

सारस्वत

विशेष म्हणजे त्या केंद्रावरील ७११ मतदारांपैकी ७०५ मतदारांनी मतदानही केले म्हणून जाहीर झाले. मतदान केंद्राचा अधिकारी तर फारच हुशार होता. मतदानाची वेळ सायंकाळी ५ असूनही त्याने मात्र त्या मतपेटया चार **मैलावरच्या राजौरी** केंद्रावर त्या दुपारी चारच्या आधीच नेऊनही दिल्या. मतदारांच्या वोटावर खुणा नव्हत्या. खरा मतदार आला तर "तुझे मत नोंदवले गेलेले आहे" अशी उत्तरे दिली जात होती. काही मतदान केंद्रावर **'शंभर टक्के'** मतदान झाले (अर्थातच वरील पद्धतीने) त्याठिकाणची काही माणसे मेलेली असताना व काही हाजच्या यात्रेला गेलेली असताना असे मतदान झाले. असे मतदान अनेक ठिकाणी बर्फ पडत असताना, डोंगराळ भागातील मतदान केंद्रावर झाल्याचे वृत्त आहे. अर्थातच असे प्रकार फक्त काश्मीरमध्येच झाले असतील असे नाही.. क्वचित् प्रमाणात ते इतरत्रही झाले असतील. खंडप्राय देश आहे. खेड्यापाड्यातून शिक्षित–अशिक्षित जनतेने हा मतदानाचा मौलिक हक्क बजावला. तो बजावीत असताना स्थानिक परिस्थितीनुसार काही कमजास्त गुंडगिरीचे, मारहाणीचे, खोटया मतदानाचे, राज्य यंत्रणेच्या गैरवापराचे प्रकार झाले असतीलही. परंतु एवढया खंडप्राय देशातल्या, जगातल्या एका मोठ्या लोकशाहीचा मतदानाचा हा 'अभूतपूर्व' प्रयोग यशस्वीपणे पार पडला आहे, त्यात अनेक अभूतपूर्व गोष्टी घडल्या आहेत. माणसे विकत घेता येतात ह्या परंपरागत श्रद्धेला तडे गले आहेत. जनतेच्या मनातल्या असंतोषाला काही दिशा लाभली आहे. तो असंतोष आता "मत पेटयांना" आकार देऊ लागला आहे. वीस वर्षाच्या प्रदीर्घ कालखंडानंतर, सतत तीन निवडणुकांतून संधि दिल्यानंतर, पंडित नेहरूंच्या शब्दावर विसंबून, एक पक्षीय लोकशाहीवर श्रद्धा बाळगून मतदान केल्यानंतर आज मतदार उभे होते एका सीमारेषेवर. "यांनाच अधिक एक वार संधि द्यायची की इतर पक्षांना संधि द्यायची" असा प्रश्न त्यांच्यापुढे होता.

आणि एक महाराष्ट्र सोडला तर जनतेने आपले मत काहीसे स्पष्टपणे, निडरपणे, डोळसपणेही व्यक्त केले आहे असे दिसते. ही जी प्रचंड उलथापालथ झाली तिची चिकित्सा होणे अगत्याचे आहे. कुणाला तरी फेकायचे म्हणून जनतेने कुणाला तरी उचललेले नाही. त्या उचलण्यामध्ये काही 'संगति' आहे. काही 'दृष्टि' आहे. काही नव्या (नव्या वाईट) श्रद्धा आहेत. त्या घटनांचा शोध घेतला जाणे अगत्याचे आहे. त्यातून येणाऱ्या 'फलितां'चीही चर्चा केली गेली पाहिजे. भारतीय लोकशाहीच्या भवितव्याचे दृष्टीने ही चर्चा आवश्यक आहे असे वाटते.

सुरुवातीलाच एक गोष्ट साभिमान नमूद करायला हवी की, ही निवडणूक अतिशय शांतपणे, खुल्या वातावरणात, लोकशाही परंपरा येथे खरोखर रुजल्या आहेत ह्याचा साक्षात्कार घडविणाऱ्या पद्धतीने पार पडली. ही 'शेवटची निवडणुक' नसून ही खरीखुरी 'पहिली' निवडणुक आहे असा नवा विश्वास भारतीय जनतेला मिळाला आहे. ह्या निवडणुकीने भारतीय जनतेला नवी कवचकुंडले दिली आहेत. अज्ञान, लांचलुचपत, पैसा, धाकदपटशा यातून पार पडून जनता आता मतदान केंद्रावर जाते आणि आपला 'कौल' देते ! 'कोण काय म्हणेल' ही भीति ती आता बाळगीत नाही. ह्यावेळी जनता अधिक निर्भय झाली आहे. मुक्त झाली आहे. 'स्व-तंत्र' झाली आहे असे दिसते. हा नवा साक्षात्कार 'मनोज्ञ' नाही काय ? त्यातूनच ह्यावेळी घडले अनेक चमत्कार ! प्रांताप्रांतातून तर काही मंत्री, उपमंत्री पडलेच. पण केंद्रीय मंत्री–उपमंत्र्यांपैकी 'भले बहाद्दर' ही पडलेले आपण पाहिले. ह्यातही काही सूत्र दिसते. 'अवमूल्यन'फेम शचीन चौधरी पडले. 'झोनल' पद्धतीमुळे कृत्रिम अन्नटंचाई उत्पन्न होऊ देणारे अन्नमंत्री सुब्रह्मण्यम् पडले. मनुभाई शहा, राजबहादुर पडले. मुंबईचे अनभिषिक्त राजे स. का. पाटीलही पडले. आणि एक नवा आत्मविश्वास मतदारांना मिळाला. "Power corrupts, and an absolute Power corrupts absolutely" असे म्हटले जाते. वीस वर्षांच्या अनिर्बंध सत्तेने एक 'मिजास' काँग्रेसला प्राप्त झाली होती. जुन्या सरंजामशाहीतले सारे दुर्गुण तिच्यात शिरू लागले होते. राजदरबारी भाटचारण असत. खुषमस्करे असत. प्यादे फर्जी असत. भालदार चोपदार असत. आजची काँग्रेसची यंत्रणा ही अशीच 'संस्थानी' होऊ लागली होती. जनतेच्या सुखदुःखांशी तिची फारकत झाली होती. सेवेसाठी संधी' ही १९४७ ची भूमिका सुटली होती आणि 'सुखांसाठी सत्ता' ही नवी भूमिका तिने घेतल्यासारखे जाणवत होते. पंडितजींचा वटवृक्ष होता तोपर्यंत ह्या खुज्या रोपट्यांना छाया–संरक्षण मिळाले. पण तो उन्मळून पडताच ही रोपटी 'उघडी' पडली व आता जनतेने त्यांना 'आपापले स्थान' दाखविले आहेसे दिसते. निवडणुकीच्या आघाडीच्या वर्षात पाक–युद्धाचा काळ सोडला तर सतत अशांतता नांदत आलेली होती. अंगार धुमसत होता. असंतोष धुमसत होता. एकतंत्री, भ्रष्ट, जनताविन्मुख अशा ह्या राजवटीबद्दलचा असंतोष 'वाट' शोधीत होता. तो कधी भाषेचे तर कधी पोलाद कारखान्याचे, कधी विद्यार्थी-आंदोलनाचे तर कधी अन्नाचे कारण पुढे करून आपला असंतोष कधी कधी तर हिंसात्मक मार्गानेही प्रकट करीत होता. पण ह्या मार्गांच्या मर्यादा स्पष्ट होत्या. गाड्या पाडून राज्य बदलणार नव्हते. बसेस पेटवून खुर्च्यांवरची माणसे बदलणार नव्हती. 'अन्ना'च्या ओरडीने 'झोनल' पद्धत रद्द न करण्याचा हट्ट परागंदा होणार नव्हता. जनतेला वाट हवी होती. ते असंतोषात्मक उद्रेक हे सारे चाचपडणे होते. ती वाट निवडणुकीनी उपलब्ध करून दिली आणि मग जनमताचा वरवंटा गरगर फिरला. सारे चित्र पालटून टाकण्याइतपत फिरला. पालटलेले चित्र पाहून दिल्लीश्वरांपासून गल्लीश्वरांपर्यंत साऱ्यांच्या झोपा उडाल्या आहेत. सारे सावध झाले आहेत. त्यातूनच शहाणेही होतील हा नवा विश्वास आता जनतेला मिळाला आहे. भारतीय राजकारणाला व राज्यकारभाराला आलेली मरगळ झाडून टाकण्याचे एक फार मोठे क्रांतिकारी कार्य ह्या निवडणुकीनी केले आहे. आजवर प्रभावी विरोधी पक्षच नाही त्यामुळे राज्यकर्त्यांना हटकणार कोण ? आणि कसा ? अशी स्थिति होती. इंग्लंडसारख्या देशात द्विपक्षीय लोकशाही असल्यामुळे एखाद्या पक्षाचा राज्यकारभार जनतेला जर पसंत पडला नाही तर राज्यकर्ते बदलण्याचे कार्य तेथे अवघड वाटत नसे. वाटत नाही. परंतु आपल्याकडे पक्षबाजीच्या बुजबुजाटामुळे ही स्थिति










कधी येणारच नाही अशी एक विकल जाणीव जनतेत व पक्षनेत्यातही उत्पन्न होऊ लागली होती. विरोधी पक्षीयांची मतसंख्या जास्त असूनही शेवटी काँग्रेसचेच राज्य संघटित पक्ष म्हणून येत असे. ही स्थिति बदलण्यासाठी १९६७ च्या सार्वत्रिक निवडणुकीत काँग्रेसेतर पक्षांनी विचार पक्का केलेला दिसला. त्यामुळे संयुक्त आघाड्या, तडजोड, एकमेकांसाठी उमेदवार मागे घेणे, पुरस्कार देणे वगैरे प्रकार झाले. डाव्यांनीही आघाड्या केल्या आणि उजवेही एकत्र आले. त्यामुळे निवडणुकींना वेगळाच रंग आला व आजच्या लोकशाही भारताचे व केंद्राचेही चित्र काहीसे चमत्कारिक व अडचणीचे असे झाले आहेसे दिसते. अर्थात ही अडचण मुख्यत: केंद्रशासनाची आहे. आजवर घटनेतल्या तरतुदींचा सर्वस्वी उपयोग करण्याचा प्रसंग आला नव्हता. प्रांत आणि केंद्रस्थानी एकपक्षीयच, अनिर्बंध सत्ता होती. आता मात्र नऊ प्रांतात काँग्रेसची सत्ता राहील तर सात प्रांतात अन्य राजवटी राहतील. ह्या साऱ्या राजवटी पुन्हा एकपक्षीय नाहीत. मद्रासमध्ये द्रवीड मुनेत्र कळघमची तर केरळमध्ये डाव्या कम्युनिस्टांची, ओरिसात जन काँग्रेस व स्वतंत्रांची तर वंगालमध्ये वांगला काँग्रेस व डाव्या पक्षांची, पंजावात संत फत्तेसिंग-तारासिंग गट, जनसंघादि मंडळींची अशा भिन्न राजवटी आल्या आहेत. ह्या राजवटीप्रमाणेच राजस्थानमध्येही स्वतंत्र—जनसंघादि विरोधी दलांची राजवट येईल अशी चिन्हे दिसत होती. परंतु गव्हर्नर संपूर्णानंद यांनी जो निर्णय घेतला तो निर्णय तात्त्विक दृष्ट्या वरोवर असला तरी विरोधकांना संधि दिली गेली नाही आणि स्वतंत्रांचा विचार डावलला गेला ह्या कारणांनी राजस्तानमध्ये राज्यनिर्मितीपूर्वीच असंतोषाचा भडका उडाला. प. वंगालमध्ये सतत विरोधी पक्ष म्हणून राहिलेला कम्युनिस्ट पक्ष राज्यावर आला. अर्थमंत्री म्हणून ज्योति बसू यांनी अंदाजपत्रक मांडले. ओरिसाच्या नव्या राज्यकर्त्यांनी पटनाइक-मित्रा आदि मंडळीच्या 'इस्टेटी'संबंधी चौकशी करणारे मंडळ नेमले. अण्णा दुराइनी 'इंग्रजी'ला स्पेशल स्टेटस' ची मागणी केली. ह्या व अशासारख्या घटना वाटचाल करीत आहेत. हे सारे नवीन असले तरी कधीतरी हे घडणारच होते. वीस वर्षानंतर जागृत झालेल्या लोकशाहीने काँग्रेस पक्षाला व केंद्र शासनाला दिलेले हे एक नवे आव्हान आहे. हे आव्हान स्वीकारून त्यावर कुशलतेने मार्ग काढणे ह्यातच शासकीय पक्षाची खरी कसोटी आहे. प्रांतांना अधिक स्वातंत्र्य असावे अशी मागणी पुढे येत आहे. जनतेचा विश्वास त्यातूनच संपादित केला जाऊ शकेल असे मतही व्यक्त होत आहे. नव्या परिस्थितीचा सांगोपांग विचार करून सांकेतिक राज्यपद्धतीचा कोष फोडून केन्द्राला आता बाहेर पडावे लागेलसे दिसते आहे.

लोकसभेच्या निवडणुकींचे चित्र आता पूर्ण झाले आहे. काँग्रेसला प्रांताप्रमाणेच तेथेही जोराचा पराभव पत्करावा लागला आहे. ५२१ सदस्यांच्या सभेत काँग्रेसला २७८ जागा मिळाल्या असून











स्वतंत्र ४५, जनसंघ ३५, द्रवीड मुनेत्र कळघम २५, कम्युनिस्ट २१, कम्युनिस्ट (मा) १९, सं. सो. पा. २३, प्र. सो. पा. १५, स्वतंत्र ३७, इतर १४ अशा क्रमाने अन्य पक्षाला यश मिळाले आहे. काँग्रेस आणि काँग्रेसेतर अशी शक्ति २७८ विरुद्ध २३४ अशी होते. त्यातही विरोधी पक्षीय नेत्यात निवडून आलेली माणसे पाहिली की, संख्या आणि कर्तृत्त्व ह्या दोन्ही दृष्टींनी काँग्रेसला यापुढील काळात फार सावधगिरीने पावले टाकावी लागणार आहेत हे खरे ! ह. वि. कामथ, आचार्य कृपलानीसारखी माणसे पराभूत झाली असली तरी स्वतंत्र पक्षाच्या वतीने निवडून आलेले मिनू मसानी, एन्. दांडेकर, महाराणी गायत्रीदेवी, संयुक्त समाजवादी पक्ष नेते डॉ. राममनोहर लोहिया, मधु लिमये, जॉर्ज फर्नांडिस, जनसंघ नेते प्रा. बलराज मधोक, अटलबिहारी बाजपेयी, एम्. एल्. सोंधी, जगन्नाथराव जोशी, स्वतंत्र प्रकाशवीर शास्त्री, बॅ. एन्. सी. चतर्जी. कम्युनिस्ट डांगे, गोपालन, हिरेन मुकर्जीसारखी माणसे विरोधी पक्षात आहेत. हुकमी बहुमत आज घसरले आहे. जेमतेम चाळीस नेते अधिक आहे. अशा वेळी काँग्रेसवर व विशेषत: पक्ष नेत्यावर फार मोठे दायित्त्व आहे ! हम करे सो कायदा ही स्थिति चालणारी नाही. घटनेच्या तरतुदींनुसार दोन तृतियांश बहुमत नसल्याने यापुढील काळात राष्ट्रपति नामधारी व नाममात्र घटनात्मक प्रमुख राहू शकणार नाही. पंतप्रधान वा राज्यकर्ता पक्ष ह्यांना त्याचे 'प्रमुखपद' सर्व अर्थांनी मान्य करावे लागेल. त्यांचे मार्गदर्शन घ्यावे लागेल. क्वचित प्रसंगी पटेल–रुचेल असे नसले तरी मानावेही लागेल. ह्या दृष्टीने राष्ट्रपतिपदासाठी डॉ. राधाकृष्णन् यांनीच पुन्हा निवडणुक लढवावी असा सल्ला दिला जात आहे. राजाजी, जयप्रकाश नारायण यांचीही नांवे पुढे येत आहेत. आज विरोधी पक्षांचाही आदर जिंकू शकेल असा राष्ट्रपति हवा आहे. म्हणूनच ह्या सारख्या सूचना वारंवार पुढे येत आहेत.

ह्या निवडणुकीत उजवे–डावे विजयी झाले असे दावे-प्रतिदावे आपापल्या पत्रातून केले जात आहेत. आणि त्यात न वसणाऱ्या द्रवीड मुनेत्र सारख्या पक्षांना आपल्या दावणीला बांधून आपलेच नाक वर कसे हे सिद्ध करण्याचा आटापिटा होत आहे. पुरोगामी-प्रतिगामी ह्या शब्दांची धोंडेफेक चालू आहे. उत्तर दक्षिण असाही वाद खेळला जात आहे. पण प्रत्यक्षात मात्र फक्त डावे वा उजवे हे एकूण जिंकले असे म्हणता येत नाही. स्वतंत्रांची संख्या ह्या 'पक्षीय' निवडणुकीतही मोठी आहे ही गोष्ट विचारार्ह आहे. पंजाब, प. बंगाल, ओरिसा, बिहार, केरळ, मद्रास इत्यादि प्रांतात काँग्रेस सत्तेवर आली नाही. पण तेथेही मद्रास सोडून एकपक्षीय सरकार कुणालाही बनवता आले नाही. काही ठिकाणी तर ही मोट फारच 'नाजुक'-पणे बांधली गेली आहे (संत फत्तेसिंग-तारासिंग गट, जनसंघ वगैरेंची) अर्थातच ह्या मोटी गरजेपोटी बांधल्या गेल्या आहेत. ह्यातून स्थिर व कार्यक्षम शासन मिळणार आहे की नाही हे दिसायचे, ठरायचे आहे. पण एक महान् संधि वीस वर्षांनंतर विरोधी पक्षाच्या दाराशी चालत आली आहे. अगतिकांना गति मिळाली आहे. त्यातून काही चांगलेही घडेल अशी आशा करायला हरकत नाही. कदाचित् शास्त्रीजींप्रमाणे ही नवी मंत्रिमंडळे काही 'नवा इतिहास' नोंदवून ठेवतीलही ! आज देशाला हवा असलेला बदल ही माणसे देऊ शकली तर, उरलेल्या नऊ प्रांतांनाही काही नवा बोध घेता येऊ शकेल. ह्या निमित्ताने अनेक पक्ष एकत्र येत आहेत. आग्रही कडवी भूमिका सैल होत आहे. 'तडजोड' होऊ शकते ह्याचा प्रत्यय येतो आहे. कानेकोपरे घासले जात आहेत. कदाचित् यातून कम्युनिस्ट आणि कम्युनिस्टेतर अशा दोन गटात विभागणी होऊन द्विपक्षीय लोकशाही येथे नांदूही शकेल. कम्युनिस्टांनी लोकशाही चौकट आता मान्य केली आहे (करावीही लागली असेल) पण कडवी पक्षनिष्ठा राष्ट्रहिताच्या आड येणार नाही एवढे सामंजस्य ह्या 'जनता–संपर्कातून' साधले तरीही त्यांचे स्वागत करायला हरकत नाही. कडवी राष्ट्रनिष्ठा हवी. पक्षनिष्ठा गौण आहेत. दुय्यम आहेत हे येथे रुजले पाहिजे. तरच स्थिर व समर्थ शासन येथे नांदेल.

एकटया महाराष्ट्रात काँग्रेसने नेत्रदीपक यश मिळविले आहे. "संपूर्ण महाराष्ट्र समिती" फारशी यशस्वी झाली नाही. त्या नांवाने फारशी 'किमया' साधली नाही. जनसंघाने महाराष्ट्रात प्रथमच स्वत:चे नावावर व कार्यक्रमावर चार जागा मिळविल्या आहेत. ना. नाईक, ना. चव्हाण यांच्यावर येथील जनतेचा विश्वास दिसतो. ह्या निवडणुकीतला आणखी एक विशेष म्हणजे माजी संस्थानिक वा संस्थानिकांच्या पुत्रपौत्रांनी केलेला राजकारण प्रवेश व संपादिलेला विजय ! अजूनही राजा वा राजवंशाविषयी प्रजा-मानसात प्रेम आहे.आदर आहे हे पुन्हा सिद्ध झाले आहे. सेनापति थोरात पडतात. राजमाता निवडून येते. ' ह्यात 'नवे राजवंश' निर्माण करून, त्याचे कौतुक करीत राहणाऱ्याना खंत वाटू नये. प्रतिगामित्व दिसू नये. ग्वाल्हेर, जयपूर, कोल्हापूर, सावंतवाडी, जव्हारादि ठिकाणी संस्थानिक निवडून आले. त्यांना 'वंदी' केली पाहिजे असा एक सूर अतुल्य घोष यानी मध्यें काढला होता. पण "काँग्रेसच्या तिकिटावर संस्थानिक विजयी झाला तर चालतो काय ?" असा सवाल कुणीही करील. ह्या संस्थानिकांचाही 'देशकारणी' उपयोग झाला पाहिजे. अन्यथा ते कर्तृत्त्व 'पेन्शनी'त गंजून जाईल. अखेर तीही 'माणसे' आहेत. देशाचे घटक आहेत. नागरिकत्व त्यांना नाकारता येणार नाही. स्वराज्यातले त्यांचे स्थान पटेलांनी मान्य केले होते. इतिहासाला परंपरा विसरता येणार नाही.

ह्या सार्वत्रिक निवडणुकीचा हा आढावा अखेर काय दर्शवितो ? हे चित्र आशादायक आहे का ? की भीतिदायक आहे? आम्हाला ते आशादायक वाटते. नवजागृति सूचक वाटते. मतपेटीतून ही क्रांति घडली आहे म्हणून तर तिचे महत्त्व अधिक वाटते. एक प्रकारची डबक्यासारखी स्थिति येथल्या राजकारणाची झाली होती. बांध फुटले आहेत. घाण पाणी वाहू लागले आहे. त्याचा निचरा झाला पाहिजे. नवे पाणी आले पाहिजे. मक्तेदारी एकूण वाईटच ! विशेषत: लोकशाहीतली तर घातकच ! आता सारे शासनच 'सावध' होईल. कार्यक्षम होईल. 'जाब' विचारणारी व 'जरब' दाखविणारी शक्ति वाढते आहे ह्या जाणीवेने प्रांतोप्रांती आता गलथानपणा राहू शकणार नाही. जनतेची 'भीति' वाटत नव्हती. आता जनतेने 'तांडव' सुरू केले आहे. असुर, अशिव शक्ति आता थैमान घालू शकणार नाही. गेल्या सार्वत्रिक निवडणुकीनी सर्वांनाच हा परखड इशारा दिला आहे तो मानून सारे पक्ष व प्रांतीय शास्ते वागतील तर ह्या देशाचे मानचित्र बदलेलेही ! भारतीय जनशक्तीच्या ह्या अपार सामर्थ्याला व तिने घडविलेल्या ह्या नव साक्षात्काराला ह्या निमित्ताने अभिवादन करतो. जयहिंद ! ●●●




## बडोद्याला चला (अहो, फुकट)

**मंडळी,** साहित्य संमेलने भरतात, वाङमय परिषदा , भरतात, साहित्यसभांचे वार्षिक कार्यक्रम होतात, महाविद्यालयाच्या वाङ-मय मंडळांची उद्घाटनें होतात. त्यापैकी कोणकोणत्या कार्यक्रमांना तुम्ही कधी गेला आहात? कधी जाता का? कधीच जात नाही म्हणतां? त्यात काय पहायचं असतं असं म्हणतां? साहित्य संमे-लनात ऐकायसारखं आणि पहायसारखंही वरंच असतं मंडळी. आतां साहित्यसंमेलनात तुम्हाला तथाकथित उच्चभ्रू साहित्यिक दिसणार नाहीत. नवसाहित्यावर (नको असली तरी) चर्चा असेल, पण नवसाहित्यिक दिसणार नाहीत. कविसंमेलने भरलेली दिसतील पण (नियमाला अपवाद करून) पैसे दिले तरच आजचे काही आघाडीवरचे कवि तुम्हाला भेटतील. साहित्य संमेलनातले करमणुकीचे कार्यक्रम तरी तुम्हाला खासच आवडतील. साहित्यसंमेलनाला साहित्यिक फारसे येत नाहीत म्हणून "वृथा खंत कशाला?" भाइयो, आजचा जमानाच तसा आहे. फक्त "पाटचा" उरल्या आहेत, माणसे कधीच पळून गेली आहेत. भिकबाळच्या गेल्या आहेत भोके उरली आहेत....सिंह गेले आहेत, सिंहासने फक्त (तीही नामधारी) उरली आहेत. राजे वाटा-वेत असे राजे गेले आहेत, आता पंत्यातले राजे गादीवर बसतात आणि गुरकावतात. मग होतो हंशा! तूर्त तुम्ही हंसा झालं!

तेव्हा साहित्य संमेलनाला जात जा. उच्चभ्रू साहित्यिकाना भेटायचं असलं तर साहित्यातले चालू नाके आहेत ना, तिकडे चला. पण 'नाक्यां'वर उभं राहणं कदाचित् तुमच्या प्रकृतीला सोसणार नाही. एखादा 'पोक्या' तुम्हाला भलत्याच गल्लीत घेऊन जाईल अन् होईल पंचाईत. आपण जाऊ या बडोद्याला मराठी वाङमय परिषदेला. मंडळी, भाडं पडणार नाही. सवलती असूनही साहित्यिक संमेलनाला जात नाहीत असे सरकारच्या निदर्शनाला आल्याने साहित्यिकांना 'हे अवघे जग खेळायला' फ्री ठेवले आहे. (म्हणजे तरी लेकाचे जातील) तेव्हा बडोद्याला चला. बडोद्याला चला! बडोद्याची मंडळी मोठी निष्ठावान! दरवर्षी हा सोहळा भरवतात–मराठीतली मातबर माणसं जमतात जमवतात. मराठी मुलुखात, श्रीमंत मुंबईत एखादे उपनगर साहित्य संमेलन (कुणीच भरवीत नाहीत म्हणून वर्षं दोन वर्षं वाट पाहून) साहित्य संघ 'कसेबसे' पार पाडतो. पण सयाजी-रावांच्या तालमीतली ही अमराठी मुलुखातली मंडळी मोठी-जिद्दीची बरं का अशा थाटात ही वाङमय परिषद भरवतात की देखते रहो. आपले घाटे जाऊन आले, दांडेकर अण्णा काही तरी 'स्पिरिच्युअल' बोलून आले. (अजून त्यांच्या भाषणात नेमके काय सांगितले त्याचा शोध बडोद्यात चालू असल्याचे ऐकतो) भावे–रणजित देसाईनी "नव्या वाङमयीन फॅडस्"च्या टोप्या उडविल्या (आणि मग आपल्या अंगावर धुरळा उडवून घेतला) यंदा गेले आपले नाशिककर नाटककार वसंतराव कानेटकर! आता नाटककार म्हटलं की तो नाटकावर बोलणारच, नाही का? पण कानेटकर नुसते नाटककार नाहीत–ते कथा-कादंबरीकारही आहेत आणि मुख्य म्हणजे मराठीचे प्राध्यापक आहेत. तेव्हा (आणि मुख्य म्हणजे ती वाङमय परिषद असल्याने) कानेटकर वाङमयावरही बोलले. कानेटकर तथाकथित न (वा नव) नाटचवादी नसल्याने त्यांना "स्वगते" चालतात. आपलं हे स्वगतच (पण बोंबल्या असल्याने) साऱ्यांना ऐकू जाईल अशी खात्री होऊन केलेलं" अशी भूमिका त्यांनी घेतली. अहो, ही भूमिका घेतली म्हणून तर (कान लांब नसूनही) मला ते भाषण इथवर ऐकू आलं! (इथवर म्हणजे नेमकं कुठवर हा प्रश्न अनपार्लमेंटरी बरं का)

'मराठी नाटक थिटे कां आहे?" याची चर्चा करून कानेटकरांनी जे सांगितले आहे ते पटते. नाटक ही 'कला' म्हणून आपल्याकडे वाढलीच नाही. 'व्यवसाया'च्या विचारातच ती गोष्ट सतत फिरली आणि मग नाटककारांच्या कलेला सतत 'व्यावसायिक' तडजोड करीत रहावे लागले आहे. प्रयोगांना वाव मिळेल अशी प्रायोगिक रंगभूमी इथे उभी राहिलीच नाही. प्रयोगशील नाटक-कारांना शेवटी "व्यवसाय" मान्य करावा लागला. 'अशी एक बोलकी' वेदना ह्या स्वगतात आहे. त्याजबरोबर 'नवनाटच'-वाल्यांचा (अहंकारी) गैरसमजही कानेटकर यांनी तेवढ्याच परखडपणे मांडला आहे. "जे प्रेक्षकांना (अगदी सुजाणही) सम-जत नाही ते 'ग्रेट' असलेच पाहिजे–आहेच!" वगैरे (गैर) समज कसे प्रयोग व प्रगतीच्या आड येतात ते कानेटकरांनी दाखवून दिले आहे. मंडळी, मी "खुर्च्या" पाहिल्या! तुम्ही नाही ना पाहिल्या! धन्य तुम्ही! म्हणूनच ते त्या खुर्च्या पुन्हा दाखवीत नाहीत. तुम्हाला समजायच्या नाहीत त्या! तुम्ही आपली (समजणारी)

कोल्हटकर-अत्र्यांची नाटके वघा झालं! प्रयोग+व्यवसाय ह्यांनी कुठे तरी एकत्र येऊन तडजोड केली पाहिजे हे पटलं आपल्याला! भाऊबंदकीने घरं फुटतात. कला फुलत—वहरत नाहीत. मग खांडेकर, दाते, म्हणतात तशी सूज येते सूज! कथा कुणाची, नयन तुझे जादुगारसारखं व्हायला हवं. प्रथम प्रायोगिक मग व्यावसायिक—नव्या प्रयोगांना यातून उघाण येईल वघा!

यात नाटकाची चर्चा झाली. पण साहित्याचे शवच्छेदन कुठे? कानेटकरांनी तेही चांगल्या परखड शब्दात केलं आहे. **आजच्या नवसाहित्यिकांची बेपर्वाई ही एक 'पोज' आहे—उसने अवसान आहे** अशा शब्दात कानेटकर त्यांची 'पोल' खोलतात. आणि **"ही सारी उत्तुंग आणि बेबंद आत्मनिष्ठेची विखारी फळे आहेत** हा विखारी इषारा देतात. 'नवसाहित्या'ची परंपरा केशवसुत, दिवाकर कृष्णांचीच आहे हे दाखविण्यासाठी कानेटकरांनी जी उदाहरणे दिली आहेत ती सुजाण साहित्य रसिकाला पटतील (झपुर्झा, हरपले श्रेय व मर्ढेकरांच्या काही कविता व मृणालिनीचे लावण्य व तलावातले चांदणे) **"वैफल्य व अश्रद्धा हाच नवतेच्या निर्मात्यांना जडलेला जहरी रोग आहे."** असं सांगून कानेटकर ह्या दोन गोष्टींची चर्चा करतात ! ! "वैफल्य यावे असे आपले समाजजीवन भ्रष्ट व व्यक्तिजीवन लाचार झाले आहे" असे मान्य करूनही ते विचारतात की "कवि कलावंतांनी ह्या वस्तुस्थितीपुढे शरण जावे इतका प्रचंड उत्पात वा अनर्थ खरोखरच ओढवला आहे का ?" पण वैयक्तिक वैफल्य पचविल्यानेच 'अमृता तेहि पैजासि जिंकणाऱ्या गोड शब्दात ज्ञानेश्वरीची रचना झाल्याची व इतर अनेक प्राचीन व आधुनिक काळातील उदाहरणे ते देतात आणि म्हणतात, **"त्यामुळेच मूर्तिभंजनाच्या आवेशाने नवसाहित्यकारांनी इतिहास, परंपरा, श्रद्धास्थाने, विविध साहित्य प्रकार आणि शब्द यांची जी मोडतोड चालवली आहे आणि शाक्त पंथीयाप्रमाणे अमंगलाचीच मंगल म्हणून जी तऱ्हेवाईक उपासना चालविली आहे ती रागापेक्षा त्राग्यातून आणि क्रांतीपेक्षा भीतीतून उपजली आहे असे वाटू लागते."** शेवटी **"लेखकाचे स्वातंत्र्य हे अविकसित व अर्धविकसित समाजातले चैतन्य जागे ठेवण्याचे एकमेव आशास्थान आहे."** असे सांगून कानेटकरांनी "साहित्यातले उत्तम काय आणि अधम काय हे ठरविण्याचा अधिकार साहित्यिकारांचा आणि रसिकांचा आहे. नाक्यावरल्या पोलिसाचा वा गृहमंत्र्याचा नाही" हा विचार सांगितला. आज हा अधिकार 'सेन्सॉर' ह्या 'सभ्य' व 'सोज्वळ' नावाने त्यांच्या हाती आहे. आणि नाटच-साहित्य विषयात त्यांचा धुमाकूळ अधिक दिसतो. ह्या 'विनोदी' सेन्सॉरशिपची 'गंभीर' दखल कुणीतरी घ्यायलाच हवी होती. कानेटकरांनी ती घेतली. बरं वाटलं "वैफल्या"बद्दलचे बोलणे अधिक व्हायला हवे होते. पण संमेलनात साऱ्यांनाच एक 'औचित्य' व 'वेळ' सांभाळावी लागते. पण त्याची चर्चा व्हायला हवी हे खरे! बरंय्, मंडळी संमेलन संपलं. नाटक संपलं. गाण्याची मैफल संपली. प्रासंगिक चर्चा संपल्या. सब कुछ खलास. फक्त डोके (आहे म्हणून) चालू! विचार (करता येतो) म्हणून चालू! तुम्ही वघा जमलं तर! जमवा. कारण हे "वैफल्य" प्रतिमासी तुमच्या दाराशी येतंय्. विश्वास नाही ना बसत? पण ती एक "सत्यकथा" आहे (मासिक नव्हे.)

## कथा आणि कंथा

सत्यकथेवरून आठवण झाली. तुम्ही रेडियो ऐकता का रेडियो? असालच म्हणा. रेडियो ही काही चैन नाही. अगदी वैफल्यभावनेने भकास झालेली मंडळीही रेडियो ऐकतात. रेडियोवर जातात. वोलतात (अर्थातच हे बोलणे विफल जात नाही म्हणा. 'इष्टफल' मिळून 'कामना' सिद्धी होते—कामना "माफक" मात्र हवी) रेडियोवर हल्ली 'तुम्हा आम्हाला' फार वेळा वोलावतात. याने 'कॉमन मॅन'ला ! सध्या 'जनतेचे, जनतेसाठी वगैरेचा जमाना आहे तेव्हा 'कॉमन मेन' कुठे कुठे गेले पाहिजेतच. परवा निवडणुका झाल्या. मग आम्ही गेलो भायखळ्याच्या राणीच्या बागेपाशी. आता राणीच्या बागेकडे नेहमीच गर्दी! आणि जनता संपर्क म्हटला की गर्दीच हवी. मग आम्ही गेलो तिकडे. माणसे भेटली. त्यांच्या हातावरच्या खुणेकडे (सोइस्कर) दुर्लक्ष करून आम्ही ज्याला त्याला प्रश्न विचारला, "तुम्ही मतदान केलं की नाही?" "केलं तर" सारेच म्हणाले. चिगूताई चोपडे म्हणाल्या, भाग्या कांबळे म्हणाला, विठू रावळ म्हणाला, महंमद यासीन म्हणाला. समद्यांनी मतं दिली बरं का! कां दिली, कशी दिली, कशामुळे दिली वगैरे आम्ही न्हाइ इचारलं. आता नवं राज्य येणार. एवढ्या 'जन्तेनं' मतं दिली. नवं राज्य आलंच. मग 'अपेक्षा' आल्या. साऱ्यांनी पढीव पोपटाप्रमाणे सांगितलं "घर हवं. नौकरी हवी. पैसा हवा. चांगला (टेरिलिनचा वरं का) कपडा हवा. आणि (स्वस्त) अन्न धान्य हवं." वीस वर्षांच्या आपल्या "दिव्य" राजवटीनंतरही आपल्या 'कॉमन मॅन'ला ह्याच अपेक्षा सांगाव्या लागतात. ह्यात 'त्याचा' आणि रेडिओवाल्यांचा काय दोष? आता हे सांगायला मंडळी, राणीच्या बागेपाशीच जायला हवं सांगता? तेच प्रश्न तीच उत्तरं—फक्त आवाज वेगळा, नांवं वेगळी. 'तुम्ही आणि आम्ही' ऐकत नसलात तर ऐका. तूर्तास इये देशी कोणत्या समस्या नांदत आहेत ह्याची 'मनोरंजक' माहिती तुम्हाला मिळेल! तुम्ही 'कॉमन मॅन' आहात काय? असाल तर तुम्हांलाही 'तेवढेच रेडियोत' म्हणून अर्ज करायला हरकत नाही. मंडळी, डोक्याला त्रास नाही. विचार करावा लागत नाही. आता तुम्ही पडलात कॉमन मेन! तुम्हाला 'तसे' प्रश्न कसे विचारणार? जाऊ द्या. तुम्ही आम्ही फार 'सिरीयसली' नाही घेतलं म्हणजे झालं!

दिवाळी अंक आपण वाचतो (निदान मी तरी वाचतो) 'मोठ्या' नांवांवरच्या 'छोट्या' (व खोट्याही) कथा वाचायला मिळतात. नांव नसलेल्याची 'नामवंत' कथाही कधी कधी मनात घर करून जाते. मग अशांपैकी काही कथांच्या होतात "श्रुतिकथा!" गेल्या वर्षापासून हा एक चांगला उपक्रम रेडियोने सुरू केला आहे. गेल्या वर्षी लेखकांनीच आपल्या कथा वाचल्या










(आकाशवाणीवर अन्य कलाकारांचे सहाय्य घेऊन) त्यातल्या काही फारच चांगल्या वाचल्या गेल्या. (कथाही चांगल्या होत्या—अपवाद एखाद दुसरा) यंदा कार्यक्रमात थोडा बदल झाला. पण 'परिणाम कमी करणारा बदल झाला. वसंत पु. काळयांनी कथा वाचली. चांगली वाचली. पण बोकीलांची 'बिंबा'! अरे अरे अरे! इतकी गचाळ "श्रुतिकथा" ऐकावी लागली म्हणता! आधी बोकीलांची ती कथा भरलीच सुमार. तिचे वाचन खोटे-नाटकी—कंटाळवाणेही! काही चांगल्या कथा "श्रुतिकथा" रंगल्या नाहीत. आता रणजित देसायांची 'असा रंगला विडा' ही यंदाची एक उत्तम कथा (म. टाईम्सने कॉल दिला म्हणूनच नव्हे) पण तिची श्रुतिकथा? नाही रंगली महा-राजा! यंदा 'भट्टी' जमली नाही हेच खरं! कथांची निवडही कशी होते हो? खूप चांगल्या, नाटयपूर्ण कथा वाचनात आल्या. पण त्या आकाशवाणीच्या 'मजल्या'वर पोचल्याच नाहीत हे कसे? रेडियोने पुढील वर्षी असाच 'वाचक—कौल' मागावा. त्यातून निवड करावी. (बक्षीस वगैरे नको. डरो मत!) कल्पना फार चांगली खरं म्हणजे वर्षभर हा कार्यक्रम कां चालू नय? मासिकं किती निघताहेत. सान्याच मासिकातून 'तूर्त फक्त टाकाऊच कथा प्रसिद्ध करण्यात येतील' अशी घोषवाक्ये नसतात असं मला वाटतं! केसाळ कुत्र्याच्या पिल्लांना 'फार तर बोलावू नका! 'यांत्रिक' व 'तांत्रिक' विघाड करून ठेवायची ती! पण म्हणून काय 'बिंबा'ला बोलवायचं? असेल मंडळी, बोकीलांना 'नाव' असेल. पण 'त्यांच्या' नांवावर' काय आम्ही हे ऐकायचं? 'ययाती आणि देवयानी' नाटक मी पाह्यलं आणि नभोवाणी-वरचं नभोनाटचही ऐकलं. मन खूष झालं. अशी चांगली चांगली नाटकं रेडियोवर यायलाच हवीत. एक सुचवू का? तो मी नव्हेच; 'दुसरा' पेशवा, 'वेडयाचं घर उन्हात', वैजयंती, तुझे आहे तुजपाशी, सुंदर मी होणार, हिमालयाची बायको, जयजयकार, बेबंदशाही, यासारखी किती तरी नाटकं अधुनमधून रेडियोवर व्हायला हवीत. 'कुलवधू'सारख्या 'रेकॉर्डस' केल्या तर मजा येईल. नाटकाचे 'धनिक'च तिथे आहेत. आम्ही अधिक काय सांगायचं मंडळी?



# रंग आणि रेषा—

या महिन्यात चित्र-शिल्प प्रदर्शनं खूप पाह्यला मिळाली. जहांगिर आर्ट गॅलरी, केमोल्ड आणि पुंडोले आर्ट गॅलरीतून खूप भटकलो. 'वांद्रा स्कूल ऑफ आर्ट'चे एक विविध रंगी व विविध कलांचे प्रदर्शन पाहिले. भरडा हायस्कूलच्या विद्यार्थ्यांचे प्रदर्शन पाहिले. त्या प्रदर्शनात सहासात वर्षांच्या विद्यार्थ्यांपासून ते वीस वर्षाच्या विद्यार्थ्यांपर्यंत सर्वांचीच चित्रे होती. त्यांच्या 'पारशी' गुरूने काढलेली चित्रे तर केवळ 'अप्रतिम' होती. चित्रांना भाषा असते. रंगातून काही 'खोली' व्यक्त होऊ शकते. रंगरेषेच्या माध्यमातून 'वास्तु' सजीव होऊ शकतात हे त्या सात आठ चित्रातून जाणवून गेले. मुलांची चित्रे 'मुलांची' म्हणूनच पहायची. डोंगर, सूर्य, नदी, झोपडी, रस्ते आणि 'चार' आकडी पक्षी हा छोटयांचा फॉर्म्युला आमच्या लहानपणी होता तोच कायम आहे हे पाहून गंमत वाटली. **ज्योतींद्र जैन** ह्यांचे 'ॲबस्टॅक्टस्'चेच केवळ प्रदर्शन 'जहांगीर'मध्ये भरले होते. विविध आकृति-बंधातून काही सजीव सूचन होत होते. काही चित्रे मोहक होती. कल्पकतेने काढलेली होती. हिरो छट्पार (Hero Chhatpar) यांच्या १५ चित्रांचे एक सुंदर प्रदर्शन पहायला मिळाले. चित्र-कार तरुण आहे. वयाने लहान असूनही त्याची कला 'मोहक' वाटली. त्या चित्रात प्रामुख्याने भरणा होता निसर्गचित्रांचा (Land Scapes) प्रार्थना आणि आळस ही दोन लहान मुलांची चित्रे सोडली तर बाकीची सारी निसर्गचित्रे होती. धबधबा, कांचन-गंगा शिखरे, पाइन वृक्ष, सिमल्यातली संध्याकाळ ही चित्रे अप्र-तिम होती. रंगाची खुलावट मोहक होती. कांचनगंगा, धबधबा व सिमल्यातला रस्ता-घरे हे रेखाटन 'सजीव' होते.

असेच सुंदर निसर्गचित्रांचे प्रदर्शन **चेतन यींचे**—'जहांगीर' मध्येच भरले होते. त्या चित्रांना 'काश्मीर'ची पार्श्वभूमी प्रामु-ख्याने होती. त्यामुळे त्या चित्रांना नकळतच सौंदर्य लाभले होते. उगवतीचे आकाश, मावळतीचे आकाश, दल सरोवर, काश्मीरचे 'शिकारे' आकाशाचे (विविध) रंगदर्शन ह्यांनी ह्या प्रदर्शनाला शोभा आणली होती. 'मेड' म्हणून एकच व्यक्तिचित्र त्यात होते. तैलरंगातल्या त्या चित्रांना "खोली" होती. फ्रेमच्या चौकटीतून आत जाणाऱ्या त्या सजीव वास्तु व वस्तू वाटत होत्या. संमिश्र रंगांचा मोहक वापर जाणवत होता.

**ताहिल रिखियानी** ह्या १९६२ मध्ये जुहू समुद्रकिनारी बुडून मरण पावलेल्या चोवीस वर्षाच्या तरुण चित्रकाराच्या चित्रांचे प्रदर्शन पाहिले. 'सिंधी' रीतिरिवाज, लग्ने, नृत्यप्रकार, लग्नाची सिंद्धता, सिंधी कीर्तनकार वगैरे विषय त्यात होते. ती चित्रे पाहताना त्या कलाकाराच्या मृत्यूची (अकाली) खंत अनेकांना जाणवत होती. त्याचे छायाचित्र असल्याने तो 'होता कसा आननी' हे कळत होते.

याशिवाय हुसेन, सडवेलकर, जैन, पीर काए फोड लार्सेन ह्या डॅनिश अशा चित्रकारांची व **चाचा रोकडे** यांच्या शिल्पाकृतींचेही प्रदर्शन पाहण्याचा योग येऊन गेला. **'वांद्रा स्कूल ऑफ आर्ट** ह्यांच्या प्रदर्शनात आर्किटेक्चरपासून ते मॉडेल, कमर्शियल, शिल्प वगैरे सर्व विषयांचा समावेश होता. पोर्टेटस् (तैलरंगातली व पेन्सिल स्केचेस) होती. ती चांगली होती. वास्तवापासून ते नवचित्र कलेपर्यंतच्या सर्व प्रकारांचा समावेश होता. प्रदर्शन भव्य होते. रंगांच्या दुनियेत रंगत चला मंडळी...

**—बन्याबापू**






[अनुक्रमणिका](#)

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment APRIL 1967

DIPAVALI MONTHLY














अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट